या मुद्या संबंधाचा प्रत्यक्ष पुरावा दुसऱ्या हि एका प्रकारचा असणें संभवनीय आहे. असा पुरावा ह्मटला ह्मणजे समर्थ व छत्रपति शिवाजी महाराज यांच्या समकालीन एकाद्या प्रसिद्ध व्यक्तीनें, त्या उभयतांची भेट स्वतःच्या डोळयांनीं पाहि-ल्याचें शक, महिना, तिथि, वार इत्यादि तपशिला सह ज्या लेखांत नमूद करून ठेविलें आहे असा अस्सल लेख, हा होय. अशा प्रकारचा प्रत्यक्ष पुरावा अद्याप पावेतों, वरील तिसऱ्या मुद्यांत अंतर्भूत होणाऱ्या बाबी संबंधीं, आज पावेतों उपलब्ध झालेला नाहीं, व या च कारणा मुळें हा मुद्दा अद्याप पावेतों वादग्रस्त टापूंत राहिला आहे. या मुद्या संबंधीं आज पावेतों जीं अनुमानें काढण्यांत आलीं आहेत, त्यांत नूतन संशोधनाच्या योगानें नूतन बाबी पुढें येऊन फेरफार होणें शक्य आहे. अलीकडे वरील मुद्या संबंधीं उपलब्ध झालेल्या नूतन इतिहास साधनांतील पुरावा लक्षात घेतला असतां, पांच दहा वर्षा पूर्वीं या मुद्या संबंधीं काढण्यांत आलेल्या अनुमाना पेक्षां, शिवाजी महाराजांच्या पूर्व वयांत च त्यांची व समर्थ रामदास स्वामींची भेट झाली होती, अशा प्रकारचें अधिक बळकट अनुमान काढतां येणें आतां शक्य झालें आहे. प्रस्तुत लेखांत, उपलब्ध झालेल्या नूतन साधनांच्या आधारें, या मुद्या संबंधीं चर्चा करण्याचें आह्मीं ठरविलें असून, शिवाजी महाराजांच्या पूर्व वयांत च त्यांची व समर्थांची भेट होऊन परस्परांचें ध्येय परस्परांस विदित झालें होतें, असें आम्ही जवळ जवळ सिद्धांत–कोटींत पडेल अशा रीतीनें स्थापित करून दाखविणार आहों. इतकी प्रस्तावना करून वर दर्शविलेल्या तिसऱ्या मुद्याच्या चर्चेस सुरवात करण्या पूर्वी चर्चाविषयक मुद्याचें महत्त्व लक्षांत येण्या स्तव, वर नमूद केलेल्या पहिल्या दोन मुद्या संबंधीं सिद्धांत कोणत्या स्वरूपाचे स्थापित झाले आहेत, याचें आह्मी थोडक्यांत दिग्दर्शन करितों.

शिवाजी महाराज व त्यांचे वडील शहाजी राजे यांचें, स्वराज्याची स्थापना करण्यांत मुख्य ध्येय श्रुतिस्मृतिप्रणीत धर्माची स्थापना करणें हें होतें, हा सिद्धांत आतां सर्वमान्य झाला आहे. धुळयाच्या सत्कार्योत्तेजक सभेनें नुकत्या च प्रसिद्ध केलेल्या " महाराष्ट्रधर्म अर्थात् मराठ्यांच्या इतिहासाचें आत्मिक स्वरूप " या ग्रंथांत ज्या पुराव्या वरून हा सिद्धांत निष्पन्न होतो, तो पुरावा साग्र तपशिलवार नमूद केला असून जर कोणास या सिद्धांता विषयीं अद्याप कांहीं शंका वाटत असेल, तर त्यांनीं तो ग्रंथ वाचून तिचें निरसन

करून घ्यावें. तथापि प्रस्तुत स्थळीं या मुद्या संबंधींचा अल्पसा पुरावा नमूद केल्या वांचून राहवत नाहीं. शहाजी राजे आणि शिवाजी यांचें पितापुत्राचें नातें होतें हें लक्षांत घेतां, शहाजी राजांचे शिवाजी महाराजांच्या ध्येया विषयीं उद्गार अत्यंत महत्त्वाचे व प्रमाणभूत समजले पाहिजेत, हें सांगावयास पाहिजे असें नाहीं. पुत्राच्या अंतःकरणाची बिनचूक परीक्षा पित्या वांचून दुसऱ्या कोणास करितां येणे शक्य आहे ? पुराव्याच्या दृष्टीनें या उद्गारां वरून शिवाजी महाराजांच्या स्वराज्य स्थापनेच्या ध्येया विषयीं निघणारें अनुमान निर्विवाद कोटी पैकी समजलें पाहिजे. बाजी घोरपडे यांचें पारिपत्य करण्या विषयी शहाजी राजे यांनीं शिवाजी महाराजांस जें पत्र लिहिलें, त्या पत्रांत त्यांचे खालील प्रमाणें उद्गार आढळतात:—

" बाजी घोरपडे यांनीं स्वधर्म साधणता सोडून यवन दुष्ट तुरूक याचे कृत्यास अनुकूल होऊन दगाबाजीचे हुनरेकरून विजापुरास येणें घडलें. तेथें गुजरला प्रकार निर्वाणीचा. तो तुम्ही समजलांच आहां. तो हीं प्रसंग श्री तुमचा मनोरथ सिद्धिस नेणें व स्वधर्म राज्यवृद्धी करणें म्हणोन पार पडला. सांप्रत पुन्हा दुर्बुद्धि धरून खवासखान विजापुराहून फौजे सुद्धां रवाना झाले. याची हारोळी बाजी याणी व लखम सांवत व खेम सांवत यांनीं प्रतिज्ञा पूर्वक जत करून सेना समवेत निघाले, ते तिकडे येत आहेत. तुह्मांस श्री सांब व अंबा यश देणार पूर्ण आहेत ये समयीं त्यांचे वेढे घ्यावे आण आमचे मनोदय शेवटास नेणार तुह्मी सुपुत्र निर्माण आहांत. "

( महाराष्ट्र-इतिहास-मंजिरी पान ७७ )

शहाजी राजाच्या खालोखाल शिवाजी महाराजांशीं निकट संबंध असणारे ह्मणजे त्याचे अमात्य रामचंद्र नीळकंठ हे होत. सभासदकृत बखरींत* यांचे विषयीं शिवाजी महाराजानी काढिलेले उद्गार सर्वश्रुत आहेत. त्या उद्गारां वरून अमात्यांची थोरवी व योग्यता कोणत्या प्रकारची होती हें दिसून येतें. अशा प्रकारच्या व्यक्तीचे, शिवाजी महाराजांच्या ध्येया विषयींचे उद्गार,

* टीपः—शिवछत्रपतींच्या चरित्रांतील ( कृष्णाजी अनंत सभासदकृत ) पान १०३ वरील खालील उद्गार लक्षांत ठेवण्यासारखे आहेत:—

" त्यापैकीं एक प्रल्हादपत, निराजीपंतांचे पुत्र, व रामचंद्रपंत निळोपंताचे पुत्र हे दोघे ब्राह्मण पराक्रमी होतील. उरल्यापैकीं संताजी घोरपडे व बहिर्जी घोरपडे व धनाजी जाधव हे जरी वांचले तरी हे तिघे मोठा पराक्रम करितील. मोडिलें राज्य हे तिघे ब्राह्मणव तिघे मराठे सावरतील. "

शहाजी राजांच्या उद्गारां इतके च महत्वाचे समजले पाहिजेत. अमात्यांच्या उद्गारां वरून शिवाजी महाराजांचें, स्वराज्यस्थापना करण्यांत कोणत्या प्रकारचें ध्येय होतें, हें उत्कृष्ट प्रकारें दिसून येत आहे.

" अहिवंता पासून चंदी कावेरी तीरा पर्यंत निष्कंटक राज्य शतावधि किल्ले, तसेंच जलदुर्ग, कित्येक विशाल स्थळें, चाळीस हजार पागा व साठ सत्तर हजार शिलेदार, दोन लक्ष पदाती, कोट्यावधि खाजिना, तसेंच उत्तम जवाहिर सकळ वस्तुजात संपादिले. षाण्णव कुळींचे मराठे यांचा उद्धार केला. सिंहासनारूढ होऊन छत्र धरून छत्रपति ह्मणविलें. धर्मोद्धार करून देव ब्राह्मण संस्थानीं स्थापून यजनयाजनादि षट्कर्में वर्णविभागें चालविलीं. तस्करादि अन्यायी यांचें नांव राज्यांत नाहींसें केलें. देशदुर्गादि सैन्यांचे बंद नवेच निर्माण करून एकरूप अव्याहत शासन चालविलें. केवळ नूतन सृष्टी च निर्माण केली. औरंगजेबासारिखा महान् शत्रु परितां सागरीं निमग्न करून दिगंत विख्यात कीर्ति संपादिली तें हें राज्य. " ( आज्ञापत्र पान ४ )

अगदीं अलीकडे शंभु छत्रपतीचा "बुधभूपणम्" या नांवाचा ग्रंथ प्रसिद्ध झाला आहे. त्या ग्रंथांत शिवाजी महाराजाच्या ध्येया विषयीं व त्याच्या स्वरूपा विषयीं जे उद्गार आहेत ते फार महत्वाचे आहेत. शिवाजी महाराजांच्या पित्याच्या उद्गारांस जितकें महत्त्व द्यावयाचें, तितकें च महत्त्व शिवाजी महाराजांचे पुत्र संभाजी राजे यांच्या उद्गारांस देणें जरूर आहे. कारण पित्यास ज्या प्रमाणें पुत्राचें, त्या प्रमाणे पित्याचें अंतःकरण पुत्रास बिनचूक समजतें. संभाजी महाराजांनीं ग्रंथाच्या सुरवातीस च शिवाजी महाराजांचें ध्येय कोणतें होतें व त्याचें स्वरूप कशा प्रकारचे होतें हें दर्शविलें आहे. शंभु छत्रपति म्हणतातः—

कलिकाल भुजंगमावलिढं निखिलं धर्ममवेक्ष्य विक्लवयः ।
जगतः पतिरंशतोवतापो ( तीर्णः ) स शिवछत्रपतिर्जयत्यजयः ॥

अर्थः— कलिरुपी सर्पानें धर्मास दंश केल्या मुळें तो संकटांत पडलेला पाहून ज्यानें अंशरूपानें अवतार धारण केला, अशा छत्र धारण करणाऱ्या व अजिंक्य अशा विश्वाच्या अधिपति (विष्णु) शिवाचा विजय असो.

येन क्षोणितले कलावविकले बुद्धावतारं गते ।
गोपालेखिलवर्णधर्मनिचय म्लेंछैः समासादिते ।
भूयस्तत्परिपालनाय सकलाञ्जित्वा सुरद्वेषिणः ।
स्वे स्वे वर्णपथे चिरेण विहिता विप्रादिवर्णाक्रमात् ॥

अर्थः— हा शिव कसा, तर ज्यानें गोपाळाच्या बौद्ध अवतारांतील

कलियुगाचा प्रभाव या पृथ्वीवर पडला असतां व वर्णाश्रमधर्माची म्लेंछांनीं वाताहत करून टाकिली असतां, त्याचें रक्षण व पुनरुज्जीवन करण्या करितां देवांच्या शत्रूचा पराभव केला व ब्राह्मण आणि इतर वर्णांच्या लोकांची आपापल्या वर्णाश्रमधर्माच्या ठायीं स्थापना केली. " या श्लोकांत शिवाजी महाराजांचें ध्येय उत्तम प्रकारें दर्शविण्यांत आलें असून, शहाजी राजे व रामचंद्र नीळकंठ अमात्य यांच्या उद्गारांस या श्लोकांत दर्शविलेल्या अभिप्रायाच्या योगानें उत्तम प्रकारची बळकटी येत आहे. आतां रामदास स्वामींचें ध्येय काय होतें व त्याचें स्वरूप कशा प्रकारचें होतें याचें आह्मी दिग्दर्शन करितों. "महाराष्ट्रधर्म" या ग्रंथात या विषयींची अल्प चर्चा आलेली आहे. तथापि या मुद्याची अधिक स्पष्टता करण्या करितां, समर्थांचें चरित्र समक्ष डोळ्यांनीं पाहाणारे त्यांच्या शिष्यिणीचे शिष्य जे गिरधर, त्यांनीं लिहिलेल्या अत्यंत प्रमाणभूत व विश्वसनीय अशा समर्थांच्या चरित्रपर ग्रंथांतील ह्मणजे " समर्थ प्रताप " ग्रंथांतील समर्थांच्या ध्येया विषयींचे कांही महत्वाचे उल्लेख आह्मी येथें देतों:—

समर्थें सर्वसंगपरित्याग केला यथार्थ ।
समर्थांसी आज्ञा करितील श्रीरामसमर्थ ।
धर्मस्थापना भरतखंडी कृतार्थ ।
शुद्ध परमार्थ दिसतसे ॥ ( स. प्र. पान १४ )
श्रीरामदास आह्मी सर्व ही त्वद्रूपें ।
देव दानव मानव तूंसींच स्वरूपें ।
आत्माराम तुह्मी निजात्मरूपें । धर्मस्थापना करावी ॥
ऐसें श्रीरामस्तवन श्रीसमर्थें केलें ।
श्रीरामसमर्थें कृपावलोकनें आलिंगन दिधलें ।
अवघें राममय ब्रह्मांड जालें । श्रीराम काय अनुवादती ॥
श्रीरामदास तुह्मी सर्वही मद्रूपें । देवदानव माझींच स्वरूपें ।
आत्माराम मी निजात्मरूपें । धर्मस्थापना करीन हे ॥
आतां धर्मस्थापना करावी तुह्मी । सेव्यसेवकभावें ऐक्य तुह्मी आह्मी ।
सकळ साधुसंकल्प कर्मभूमी । सिद्धिस नेईन निर्धारें ॥

[ स. प्र. पान. १६ ]

श्रीरामसमर्थउपासना । आकल्प संकल्प परंपरा जाणा ।

धर्मस्थापना जगज्जीवना । भरतखंडीं करणें असे ॥
( स. प्र. पान १७ )

समर्थ अवतार निरोपमा । आचार्य स्वामीची साजे उपमा ।
ब्रह्मचर्याश्रमीं परमहंस महिमा । ब्राह्मण्य रक्षणी अवतारु ।
ब्रह्मसूत्र आचार्य देवें रक्षिलें । ब्राह्मण्य समर्थ देवें संरक्षिलें ।
कलयुगीं संन्यासग्रहण आचार्य चालविलें । विचारसंन्यास समर्थांचे ।
आचार्यस्वामी शंकरमूर्ती । दक्षिणामूर्ती दक्षिणें ।
स्मार्त भागवत ऐक्य दोन्ही । श्रीरामसमर्थ ऐक्यपणीं ।
भगवत्स्वरूपीं साधुसंत मिळणीं । ब्रम्हानंदें स्वानंदें ॥
एवं श्रीराम समर्थ जनस्थानीं । अंतर्धानीं ऐक्य जालें धर्मसंस्थापनीं
[ स. प्र. पान १७ ]

म्हणोनि हिमालय कुंडीं । समर्थ बुडी देती ।
रघुनाथजी समर्थासी वरिच्या वरि धरिती ।
समर्थ समर्थासी गाळिप्रदानें समर्पिती । काय प्रयोजन या देहाचें ॥
तुम्हासी जगदोद्धार करणें आहे । तुमची तनु हे आमची तनु पाहे ।
दोनि तपें तुमची रक्षिली काया हे । धर्म स्थापनें कारणें ।
(स. प्र. पान १८ )

समर्थ देवें कृष्णातीरीं । नाना वैराग्यें केलीं गिरिकंदरीं ।
धर्मस्थापना चराचरीं । सर्वां सर्वत्र सांभाळिली ॥
(स. प्र. पान १२ )

समर्थ नाना धर्मस्थापना करिती । कर्म उपासना ध्यानमूर्ति ।
ज्ञान विज्ञान ब्रह्म अमूर्ती । जयंत्यापर्वी तत्पर ॥ ( स. प्र. पान १६ )

वर दिलेले उतारे इतके स्पष्ट आहेत कीं, त्या संबंधाची विशेष चर्चा करून त्यांतील अर्थ वाचकांस उलगडून दाखविण्याची कांहीं आवश्यकता आहे असें आह्मांस वाटत नाही. श्रुतिस्मृतिप्रणीत धर्माचें पुनरुज्जीवन करण्या करितां श्रीमत् शंकराचार्यांचा अवतार ज्या प्रमाणें झाला, त्या च प्रमाणें समर्थ रामदास स्वामींचा अवतार तें च कार्य सिद्धीस नेण्या करितां झाला, हा अभिप्राय वरील सर्व उताऱ्यां वरून स्पष्ट दिसून येत असून, धर्मस्थापना हें समर्थ-अवताराचें मुख्य ध्येय होतें, ही बाब उताऱ्यां वरून सिद्ध झाली आहे. आतां या संबंधाचा एक च उतारा आह्मी येथें देतों;त्या वरून धर्मस्थापना हें जें समर्थ रामदासांचें ध्येय, तें कोणत्या रीतीनें सिद्ध व्हावयाचें होतें हें स्पष्ट दिसून येणार आहे.

श्रीराम समर्थासी पश्चिम सिद्धांती राहाणें ।
सद्गुरु समर्थासी पश्चिम पर्वती निजसौख्य पाहाणें
श्रीगुरुसमर्थासी पश्चिम देशी स्वधर्मराज्य पाळणें ।
श्रीरामराज्य करणें सर्वत्र हो ॥ [ स. प्र. पान १३३ ]

आतां दिलेल्या उताऱ्यां वरून स्वधर्मस्थापना म्हणजे च रामराज्य अशी समर्थांची भावना होती असें सिद्ध होत आहे. या उताऱ्यांतील रामराज्याचा अर्थ समजल्या खेरीज, समर्थांच्या ध्येयाचें स्वरूप वाचकांच्या बरोबर लक्षांत येणार नाहीं. मखरक्षणार्थ विश्वामित्र दशरथ राजा कडे श्रीरामाच्या मदतीची मागणी करण्या करितां आले, तेव्हां ते आपल्या आईची आज्ञा मागावयास गेले असतां, श्रीरामाच्या तोंडून जे उद्गार निघाले त्यां वरून रामराज्याचें स्वरूप वाचकांचें लक्षांत उत्तम प्रकारें येणार असल्या कारणानें तें आम्ही येथें खालीं देतों:-

ब्राह्मणाच्या कार्याकारणें । अवतार घेतले नारायणें ।
म्हणोनि माये आज्ञा देणें । द्विजां रक्षणें उचित ॥
देवब्राह्मण अग्निपूजनें । नाना योग याग व्रतें दानें ।
नाना तपें तीर्थाटणें । मातें रक्षणें उचित ॥ २३ ॥
नाना पुरश्चरणें अनुष्ठानें । नाना योग नाना साधनें ।
आत्मचिंतनें स्वानंदभुवनें । स्वधर्म रक्षणें उचित ॥ २४ ॥
ब्रह्मनिष्ठ ब्राह्मण जेथें । सर्व सांडोनि धांवणें तेथें ।
नाना वैष्णवीं माया भक्त जनातें। क्षणीं बाधील म्हणूनियां ॥ २५ ॥
नाना षट्कर्में चालती जनीं । विध्योक्त क्रिया आचरती मनीं ।
ब्रह्मसंपन्नीं स्वानंदभुवनीं । नवविधा भजनीं तत्पर ॥ २६ ॥
निःकामभजनें सर्वस्वत्याग । मज निमित्य मांडती योगयाग ।
आत्मचिंतनें भवस्वर्गभोग । तुच्छ करिती स्वानंदें ॥ २७ ॥
ऐसे योगी दुर्लभ जगीं । धुंडीत चालिले वीतरागी ।
ऐसया कारणें मजलागीं । अवतार घेणें निर्धारें ॥ २८ ॥
पूर्वी सूतिकागृहीं दिधलें दर्शन । माते तुजला असेल स्मरण ।
सुरसाधुधराधर्मरक्षण । धरावया मी अवतरलों ॥ २९ ॥
एवं धर्म संस्थापनाकारणें मातें । रायें दिधलें मखरक्षणातें ।
अग्निब्राह्मण आमुचीं दैवतें । आज्ञा देई सिद्धाश्रमा ॥ ३० ॥
[ स. प्र. अनुक्रमणिका पान ४८ ]

ज्या स्वधर्मराज्याची स्थापना व्हावी अशी समर्थांची इच्छा होती, त्याचें स्वरूप या उताऱ्यांत दर्शविलेल्या प्रकारचें होतें; यास च रामराज्य समजत,

रामराज्याचें स्वरूप खालील उताऱ्यांत हि उत्कृष्टपणें चित्रित केलें आहे.

राज्य ऽ. रघुनाथाचें । कळीकाळासी नातुळे ।
बहुवृष्टी अनावृष्टी । हें कदा न घडे जनीं ॥ ७ ॥
उद्वेग पाहतां नाहीं । चिंतामात्र नसे जनीं ।
व्याधी नाहीं रोग नाहीं । लोक आरोग्य नांदती ॥ ८ ॥
युध्य नाहिंच आयोध्या । राग ना मछरु नसे ।
बंद निर्बंध ही नाहीं । दंड दोष कदा नसे ॥ ९ ॥
कुरूपी पाहतां नाहीं । जरा मृत्यु असेचिना ।
आदरु सकळैं लोकां । सख्यप्रीती परस्परें ॥ १० ॥
बोलणें सत्य न्यायाचें । अन्याय सहसा नसे ।
अनेक वर्तती काया । येक जीव परस्परें ॥ ११ ॥
दरिद्री धुंडितां नाहीं । मूर्ख हा तो असेचिना ।
परोपकार तो मोठा । सर्वत्र लोकसंग्रहो ॥ १२ ॥
अद्भूत पीकती भूमी । वृक्ष देती सदा फळें ।
अखड दुभती धेनु । आरोग्यें वाहती जळें ॥ १३ ॥
जळजें स्वापदें पक्षी । नाना जीव भुमंडळीं ।
आनंदरूप बोभाती । नाना स्वर परस्परें ॥ १४ ॥
नद्या सरोवरें बावी । डोलती नूतनें बनें ।
फळती फुलती झाडें । सुगंध वनवाटिका ॥ १५ ॥
उदंड वसती ग्रामें । नगरें पुरेंचि पट्टणें ।
तीर्थें क्षेत्रें नाना स्थानें । शिवालयें गोपुरीं बरीं ॥ १६ ॥
मठ मठ्या पर्णशाळा । रुसी आश्रम साजिरे ।
वेदशास्त्र धर्मचर्चा । स्नान संध्या तपोनिधी ॥ १७ ॥
चढता वाढता प्रेमा । सुखानंद उचंबळे ।
संतोष समस्तैं लोकां । रामराज्य भुमंडळीं ॥ १८ ॥
हरिदास नाचती रंगीं । गायनें कीर्तनें बरीं ।
राग रंग तानमानें । टाळबंधें विराजती ॥ १९ ॥
प्रबध कविता छंदें । धाटी मुद्रा परोपरीं ।
आन्वय जाड दृष्टांतें । गद्यें पद्योंचि औघडें ॥ २० ॥
नानायुक्ति नाना बुध्दी । नाना विद्या नाना कळा ।
नाना संगीत सामर्थें । नाना वाद्यें परोपरीं ॥ २१ ॥
संमार्जनें रंगमाळा । पुष्पमाळा बहुविधा ।
केशरें धुसरें गंधें । सुगंधें करताळिका ॥ २२ ॥
सर्वही तोषले तोषें । नाम घोषेंचि गर्जती ।

पुरेना दिन ना रात्री । यात्रा पर्वे हरीकथा ॥ २३ ॥
दीपिका चंद्रजोती त्या । अर्त्या नीरांजनें जनें ।
रामराजा दयासिंधु । वोळखा सेवकांवरी ॥ २४ ॥
रामदासीं ब्रह्मज्ञान । सारसार विचारणा ।
धर्मस्थापनेसाठीं कर्मकांड उपासना ॥ २५ ॥

(रामदासवचनामृत मा. पं. १. ७-२५)

येथ पावेतों नमूद केलेल्या पुराव्या वरून व तत्संबंधीं केलेल्या विवेचना वरून समर्थ रामदास स्वामी आणि छत्रपति शिवाजी महाराज या उभयतांचें ध्येय एक च स्वरूपाचें होतें, ही बाब अल्पमति माणसास हि पटण्या सारखी आहे. पहिल्या मुद्या संबंधाचें विवेचन आतां पुरें करून दुसऱ्या मुद्याच्या चर्चे कडे आम्ही वळतों.

छत्रपति शिवाजी महाराजांनीं स्वराज्यस्थापनेच्या द्वारें स्वधर्मस्थापनेचें जें ध्येय आपल्या पुढें ठेविलें होतें, तें सिद्ध करण्या करितां ज्या प्रकारच्या हालचाली त्यांनीं केल्या, त्या संबंधाचा भरपूर पुरावा उपलब्ध झाला आहे. स्वराज्यस्थापनेच्या खटाटोपास अपरिमित द्रव्याची अत्यंत आवश्यकता असते; द्रव्याच्या जोरा वर स्वराज्यस्थापने करितां धारातीर्थी देह ठेवणारीं माणसें, अश्व, शस्त्रास्त्रें इत्यादि सामुग्री शिवाजी महाराजांनीं पैदा करून महाराष्ट्रास, दास्यांत ठेवणाऱ्या विधर्मी मुसलमान गनिमांच्या कचाट्यांतून, मुक्त केलें. शिवाजी महाराजांना, शुक्रनीतीच्या खालील श्लोकांत दार्शविलेल्या स्वरूपाच्या हालचालींचा आश्रय करावा लागला. "संकट काळीं राजानें डोंगरी किल्ल्यांचा आश्रय करावा आणि तेथें राहून लूट व मारामाऱ्या करून आपलें राज्य मिळवावें" राजानं लुटारू प्रमाणें त्याच्या शत्रूची सर्व दिशांस असलेली संपत्ति लुबाडून घ्यावी."

शिवाजी महाराजांनीं स्वराज्यस्थापने प्रीत्यर्थ केलेल्या हालचालीं संबंधाची बरी च माहिती, उपलब्ध झालेल्या इतिहाससाधनां वरून सर्वत्रांस विदित आहे. या पुढें होणाऱ्या संशोधनाच्या योगानें या माहितींत भर पडण्याचा संभव असून, या मुद्यांत अंतर्भूत होणाऱ्या अनेक लहानमोठ्या बाबीं वर अधिक प्रकाश पडण्याचा संभव आहे. छत्रपति शिवाजी महाराजांच्या, स्वराज्यस्थापने प्रीत्यर्थ करण्यांत आलेल्या हालचालींचा पुरावा, बरा च उपलब्ध झाला असून या पुढें हि त्यांत अधिक भर पडण्याचा संभव आहे; हें ठीक च झालें. परंतु श्रीसमर्थ रामदास स्वामींनीं, वर दर्शाविलेल्या त्यांच्या ध्येयाच्या सिध्यर्थ कोणत्या हालचाली केल्या

व त्याचें स्वरूप कोणत्या प्रकारचें होतें, या संबंधाची कल्पना महाराष्ट्रीय जनते पुढें जित..ी स्पष्टपणें मांडली जावी, तितकी स्पष्टपणें अद्याप पावेतों मांडली गेली नाहीं. रामदासी वाङ्मयाचें जें संशोधन आज पावेतों झालें आहे, त्या संशोधना वरून समर्थांनीं भरतखंडांत अनेक मठ स्थापिले व त्या मठां वर अनेक शिष्य स्थापित केले, हें भरपूरपणें सिद्ध झालें आहे; परंतु त्यांनीं स्थापिलेल्या मठां वर अधिष्ठित असलेले मठाधिपति समर्थ रामदास स्वामींचें, वर दर्शविलेलें स्वधर्मराज्य अथवा रामराज्य सिद्ध करण्याचें ध्येय साध्य करण्या स्तव, कोणत्या प्रकारच्या हालचाली करीत असत, याची साग्र व तपशीलवार माहिती मात्र अद्याप पावेतों स्पष्टपणें नमूद केली गेलेली नाहीं. या विषयींची स्पष्ट कल्पना नमूद करण्याचा आह्मी प्रस्तुत स्थळीं थोडा बहुत प्रयत्न करतों. समर्थ रामदास स्वामींच्या ध्येया विषयींच्या दिलेल्या वरील उताऱ्यांत " श्रीगुरुसमर्थांसी रामराज्य करणें सर्वत्र हो " या ओळींत अंतर्भूत होणाऱ्या रामराज्याच्या कल्पनेची जरा बारकाईनें चर्चा करणें जरूर आहे. स्वराज्यरूपी रामराज्याची स्थापना, महाराष्ट्रांत आधिभौतिक साधनांच्या साह्यानें शिवाजी महाराजांनीं केली, हे सर्वत्रांस विदित च आहे. ही गोष्ट ग्राह्य केल्या वर मग असा प्रश्न उपस्थित होतो कीं, स्वराज्यरूपी रामराज्याच्या स्थापनेंत समर्थांचा भाग कोणता व त्याचें स्वरूप काय ? या प्रश्नाचा उलगडा उत्तम प्रकारें होऊन स्वराज्यरूपी रामराज्य सिद्ध करण्याच्या बाबतींत समर्थांचा कितपत भाग होता, हें समजण्या करितां ज्या काळीं स्वराज्यरूपी रामराज्य महाराष्ट्रांत आस्तित्वांत आलें, त्या काळीं ब्राह्मणा पासून तों थेट चांडाला पावेतों महाराष्ट्र--समाजांत अंतर्भूत होणाऱ्या, अनेक वर्णांच्या व जातींच्या जनतेची सर्वसाधारण मनोरचना कशा प्रकारची होती, याचें प्रथम दिग्दर्शन करणे अत्यंत अवश्य आहे; या बाबीची यथायोग्य कल्पना वाचकास झाल्या खेरीज, रामराज्याच्या ध्येयाच्या सिध्यर्थ रामदास स्वामींनीं केलेल्या कामगिरीचें महत्त्व, वाचकांच्या लक्षात येणार नाहीं. ज्या काला विषयीं आपणांस विचार कर्तव्य आहे, त्या काळच्या महाराष्ट्रीय जनतेचीं मनें श्रद्धावान् व भाविक होतीं; जपतपादि अनुष्ठानें, दान, शांति इत्यादि कर्में निष्ठापूर्वक केलीं असतां, तीं महत्कार्यांच्या सिद्धीस उपयुक्त होतात, अशी त्या काळच्या लोकांची भावना होती. म० इ० सा० खंड १५ लेखांक ४३४ वरून त्या काळच्या लोकांची मनोरचना कशा प्रकारची असे याची कल्पना करितां येण्या सारखी आहे. शके १५४६ च्या सुमारास चाकण प्रांतीं

पाऊस पडला नाहीं, त्या मुळें लोक परागंदा झाले. तेव्हां देशमूख, देशपांडे, कुळकर्णी, पाटील, चौधरी, शेटे, महाजन इत्यादि लोक मुरारभट ब्रह्मे याच्या कडे गेले, व दहा बारा दिवसाच्या आत पाऊस पडेल कीं नाहीं, असें त्यानीं त्यांस विचारिलें; तेव्हां मुरारभट ब्रह्मे यानीं, दहा रोजांत पाऊस पडेल असें सांगितलें; व त्या प्रमाणे पाऊस पडला ह्मणून दरसाल रुपये पचवीस (२५) इनामा दाखल वंशपरंपरा मुरारभट ब्रह्मे यास देण्या बद्दल वरील लोकांनीं मुरारभटाना सनद दिली. मुरारभट ब्रम्ह्या सारख्या सदाचरणी ब्राह्मणाचा शब्द खरा ठरून पर्जन्य पडल्या बद्दल कृतज्ञता व्यक्त करण्या स्तव, त्यास इनाम देणारांची मनोरचना श्रद्धावान् असली पाहिजे हें उघड आहे. खुद्द शिवाजी महाराज, हे जे त्या काळच्या महाराष्ट्रीय जनतेचे पुढारी, त्याची हि मनोरचना अशा च प्रकारची होती. सनदापत्रें ( बाड ) पान ११२ मध्यें गोपाळभट बिन श्रीधरभट यांस शके १५७४ चे फाल्गुन शुद्ध १ ला छत्रपति शिवाजी महाराजानीं दिलेली एक सनद छापिली आहे. त्या सनदेंत खालीं नमूद केलेला उल्लेख आला आहे, तो फार महत्त्वाचा आहेः—

"स्वामीस आपले अभ्योदयार्थ सूर्यप्रीत्यर्थ अनुष्ठान सांगितले" असें नमूद केलें असून नंतर स्वामींनीं आमचे अभ्युदयार्थ प्रतिवर्षी अनुष्ठान उत्तरोत्तर करावें व मंत्र उपदेश ही स्वामींचे वंशपरंपरेनें आमचे वंशपरंपरेस करावा" असें नमूद केलें आहे. या प्रमाणें मजकूर नमूद केल्या नंतर, गोपाळ भटास दिलेल्या देणगीचा तपशील या सनदेंत दिला आहे. या च ग्रंथाच्या ११३ पाना वर दुसरें एक दानपत्र छापिलें आहे; तें दानपत्र सिद्धेश्वरभट बीन मेघनाथभट ब्रह्मे यास शिवाजी महाराजानीं करून दिलेलें असून, त्यांत पुढील उल्लेख आला आहे. "**स्वामीच्या अनुष्टानबळें आपण राज्यास अधिकारी जालो. व सकळ मनोरथ, चिंतिलें, पावलों** ऐसा अनुभव आला ह्मणून, व संकटकाळीं साह्यकारी जाणोन पुत्रपौत्रादी वंशपरंपरने स्वामीस वर्षासन होन प तशाही १०० शभरी केले असेत" या दोन्ही उल्लेखां वरून शिवाजी महाराजांची मनोरचना, त्या काळच्या सर्व च महाराष्ट्रीय जनते प्रमाणें श्रद्धावान् व भाविक होती, हें उघड होत आहे; अशा स्वरूपाची मनोरचना ज्या जनतेची होती, त्या जनतेचा भगवद्गीतेंतील "यदा यदा हि धर्मस्य ग्लानिर्भवति भारत। अभ्युत्थानमधर्मस्य तदात्मानं सृजाम्यहं॥ भ. गी. अ. ४ श्लो. ७॥ परित्राणाय साधूनाम्। विनाशायच दुष्कृताम्। धर्म-संस्थापनार्थाय। संभवामि युगे युगे॥ ( भ० अ० ४ श्लोक ८ )

इत्यादि श्लोकांत व समर्थ रामदास स्वामींच्या "धर्म स्थापनेचे नर । जाले आहेत पुढ होणार । देणें ईश्वराचें ।" या वचनांतील सिद्धांता वर दृढ विश्वास असला पाहिजे, या विषयीं शंका घेण्याचें कारण नाहीं; रामराज्याच्या नूतन पुनरावृत्तीच्या कल्पनेस, अगोदर च अनुकूळ असलेल्या अशा प्रकारच्या महाराष्ट्रीय जनतेच्या मनोरचनेस बळकटी आणणाऱ्या, दुसऱ्या दोन बाबी त्या काळीं कारणीभूत झाल्या. या बाबी म्हटल्या म्हणजे त्या काळीं महाराष्ट्रीय जनतेंत विद्यमान असणाऱ्या कलियुगाविषयक कल्पना व त्या कल्पनेस अनुसरून त्या काळीं महाराष्ट्रांत मूर्तिमंत अस्तित्वांत असलेली परिस्थिति या होत. समर्थ रामदास स्वामी आणि छत्रपति शिवाजी महाराज याच्या अवतारा पूर्वी, महाराष्ट्रांत जे अनेक हरिकथानिरूपणी पुढारी होऊन गेले, त्यानीं पुराणांतरीं वर्णिलेल्या कलियुगाच्या स्थितीचें वर्णन केलें असून, त्यांच्या मनास होणारा खेद व उद्वेग त्यानीं अभंगरूपी उद्गारांत नमूद केला आहे; हे हरिकथानिरूपणी पुढारी नुसता खेद व्यक्त करून बसले नसून, त्यांनीं ऱ्हास पावत चाललेल्या धर्माचे पुनरुज्जीवन करण्या बद्दल परमेश्वराचा धांवा केला आहे. नमुन्या दाखल एतद्विषयक नामदेवांचा एक च अभंग आह्मी येथें देतों.

कांहीं सांगोनि गेले वचना । कृष्ण उपदेशी पंडुनंदना ।
येथें राहतां पाविजे बंधना । थोर वर्तमान कलियुगीं ॥
ये कलिमाझारीं । पुत्र पित्याचा वैरी ।
घरची माता होय कामारी । पुरुषातें नारी अव्हेरिती ।
न येती वृक्षा फळें आटती धेनु । न पिके मही न वर्षे घनु ।
यापरि आटेल सकल जनु । ऐसें जगज्जीवनु बोलिले ॥
आणिक एक वर्तेल अपवित्र । ब्राह्मण सांडतील वेदमंत्र ।
आचार सांडूनी होती शूद्र । ऐसें अपवित्र कलियुगीं ॥
थोर वर्तमान पडेल काळु । चहुंवर्णाचा होईल एकच मेळु ।
कोणी कोणाचा न धरिती विटाळु । मग गोपाळु निघते झाले ॥
आतां वेळोवेळां सांगों किती । मोडला धर्म झाली प्रवृत्ति ।
विष्णुदास नामा येतो काकुळती । कैसेनि करूं भक्ति पंढरीराया ॥
(आ. गा. पा. ४६४)

या प्रमाणें नामदेवांनीं कलियुगा विषयीं उद्गार काढिले आहेत. दुसऱ्या एका अभंगांत अशाच प्रकारचे विचार त्यानीं दर्शविले असून, शेवटीं पुढील प्रमाणें उद्‌गार काढिले आहेत; " म्हणोनिया जिवें त्रासु घेतला । सत्य लोपलें धर्म बुडाला । अजूनि काय पाहतोसि उगला । धांवे विठला म्हणे नामा ॥ " (आ. गा. पा. ४६६).

या च स्वरूपाचे त्या काळच्या दुसऱ्या महाराष्ट्रीय हरिकथानिरूपणी पुढाऱ्यांचे वाटेल तितके उद्गार दाखवितां येतील. महाराष्ट्र देशाची व त्यांतील मानवी समाजाची स्थिति त्या काळीं कोणत्या प्रकारची झाली होती व ती स्थिति निर्माण करण्यास कोण लोक कारणीभूत झाले, या विषयीं नामदेवांनीं खालील उद्गार काढिले आहेत:—

देवा पापछळें कांपते मेदिनी । षट्कर्मीं ब्राह्मणीं सांडियेलीं ।
दैत्याचेनि भारें दाटली अवनी । प्रथम चरणीं कलियुगीं ॥
(आ— गा- पा- ४६६)

या अभंगांत नामदेवांनीं दैत्य हा शब्द कोणते लोक दर्शविण्या करितां घातला आहे, हें सूज्ञ वाचकांस सांगण्याची जरुरी आहे असें नाहीं. रामदास स्वामींनीं ही च कल्पना खालील प्रमाणें व्यक्त केली आहे:—

कल्पांत मांडिला मोठा । म्लेंछ दैत्य बुडावया ।
कैं पक्ष घेतला देवीं । आनंदवनभूवनीं ॥
बुडाले सर्व ही पापी । हिंदुस्थान बळावलें ॥
अभक्तांचा क्षयो झाला । आनंदवनभूवनीं ।
पूर्वीं जे मारिले होते । तेचि आतां बळावले ।
कोपला देव देवांचा । आनंदवनभूवनीं ।
त्रैलोक्य गांजिलें मागें । ठाऊकें विवेकी जना ।
कै पक्ष घेतला रामें । आनंदवनभूवनीं ॥

समर्थांचे वडील बंधु रामीरामदास यांनीं कलियुगाचें केलेलें वर्णन हि लक्षांत ठेवण्या सारखें आहे. रामीरामदास म्हणतात:—

कलियुग महाघोर । सर्व दोषाचा आकार ।
वर्णचतुष्टय नारीनारी । सर्व धर्मपराङ्गमुख ॥
परान्न परद्रव्य परस्त्रि लोलुप । द्विज होती कैचा पापमय संकल्प ।
कैचें तीर्थव्रतदानजप । उपहास करीती त्याचें ।
मच्छमांसाशनें जीविका । होईल सर्वा ब्राह्मणादिका ।
असो सर्व धर्म लोपें लोकां । अल्पायुत्व अपमृत्यु ॥
म्लेंछ राज्य होईल प्रबळ । पीडा पावेली द्विजकुळ ।
ब्राह्मण करकर्षण भेणें विकळ । गिरी कंदरीं भ्रमती सकुटुंब ॥
अत्र तीव्र शासनी यावनी । अब्रह्मण्य जाली कित्येक अवनी ।
आतांच जाला वर्णसंकर । अवशेष उद्भवला पापाचार ।
कैंची भक्ति कैंचा हरिहर । साक्षात्कार किंचित ॥

येथ पावेतों दिलेल्या उताऱ्यांवरून कलियुग म्हणजे च म्लेंछराज्य, म्लेंछ म्हणजे पुनर्जन्म घेतलेले रावणकालीन दैत्य, आणि पूर्वकालीन दैत्यांनीं ज्या प्रमाणें देवांची विटंबना केली होती, त्या प्रमाणें च म्लेंछ लोक महाराष्ट्रांतील लोकांची विटंबना करीत आहेत, अशा प्रकारची त्या काळच्या महाराष्ट्रांतील हरिकथानिरूपणी पुढाऱ्यांची मनोरचना बनून गेली होती. ज्या नामदेवांनीं व इतर साधुसंतांनीं कलियुगप्रभावाचें वर्णन वरील प्रमाणें केलें आहे, त्यांच्या मनांत कलियुगाच्या दुस्तर स्थितींतून लोकोद्धार करण्या करितां परमेश्वर अवतार धारण करणार आहे, ही भावना वसत होती. नामदेवांचे खालील उद्गार या मुद्याच्या दृष्टीनें फार महत्वाचे आहेत:—

**कलीचिये अंतीं होणार कलंकी । मारील म्लेंछ कीं घोड्यावरी ।**
**फिरून धर्माची उभारिल गुडी । कृत युग प्रौढी करी तोची ॥**
**तोंवरि साधन हरिनाम कीर्तन । संताची संगती नामा म्हणे ॥**

रामराज्याच्या पुनरवताराच्या कल्पनेस पोषक, अशा प्रकारची महाराष्ट्रीय जनतेची मनोरचना, समर्थ रामदास स्वामी आणि छत्रपति शिवाजी महाराज अवतीर्ण होण्या पूर्वी कशा रीतीनें बनत आली होती, हें आतां पावेतों केलेल्या चर्चेत आम्हीं स्पष्ट करून दाखविलें आहे. महाराष्ट्रीय जनतेंत कलियुगविषयक विद्यमान असलेल्या कल्पनांस अनुसरून, प्रत्यक्ष वस्तुस्थिति त्या काळीं महाराष्ट्रीय समाजांत कितपत होती, या विषयीं विस्तृत चर्चा करण्याचें प्रयोजन आहे असें वाटत नाहीं. वर जे उतारे दिले आहेत त्या उताऱ्यांत महाराष्ट्रीय समाजांत त्या काळीं दृष्टोत्पत्तीस येणाऱ्या, धर्माच्या व नीतीच्या दृष्टीनें विपरीत दिसणाऱ्या सर्व बाबी नमूद करण्यांत आलेल्या आढळत होत्या; ही गोष्ट लक्षांत घेतली असतां या मुद्या संबंधीं जास्त उहापोह करण्याचें कारण नाहीं. समर्थ रामदास स्वामींचें रामराज्याचें ध्येय सिद्ध करण्या करितां त्यांनीं केलेल्या हालचालींच्या स्वरूपा विषयीं पुढील चर्चा करण्या पूर्वी, आतां पावेतों केलेल्या विवेचनाचा निष्कर्ष, सारांशरूपानें आम्ही या ठिकाणीं दर्शवितों.

शिवकालीन महाराष्ट्रीय जनतेची मनोरचना श्रद्धावान् व भाविक होती; समर्थ रामदास स्वामी व शिवाजी महाराज या च समाजांत जन्मास येऊन वाढले असल्या कारणानें, त्यांची हि मनोरचना त्या च प्रकारची होती; या मनोरचनेस धर्माचा ऱ्हास होणें व त्याच्या उद्धारार्थ परमेश्वरानें भगवद्गीतेंतील भगवंताच्या वचना प्रमाणें अवतार घेणें. या कल्पना पूर्णपणें पटण्या सारख्या

होत्या; महाराष्ट्रीय समाजांत, त्या काळीं कलियुगा विषयीं अस्तित्वांत असलेल्या कल्पना व त्या कल्पनांस अनुसरून अस्तित्वांत असलेली प्रत्यक्ष परिस्थिति या हि बाबी, धर्माच्या उद्धरार्थ परमेश्वराचा अवतार होणार या कल्पनेस पोषक अशा होत्या; या सर्वांचा परिणाम असा झाला कीं, धर्माचा उद्धार व रक्षण करण्या करितां परमेश्वर महाराष्ट्रांत अवतार घेणार, अशी भावना महाराष्ट्रीय जनतेच्या मनांत समर्थ रामदास आणि शिवाजी महाराज यांच्या काळीं उद्भूत झाली. अशा प्रकारें बनलेल्या महाराष्ट्रीय जनतेच्या मनोभूमींत अनेक पिढ्या रामभक्तिरत अशा घराण्यांत जन्म पावलेल्या व बालपणा पासून रामभक्तींत मन रत करण्याचे शिक्षण मिळालेल्या रामदासांना, श्री दाशरथि राम महाराष्ट्रीयांचा उद्धार करण्या करितां अवतार घेणार, असा स्वाभाविकपणें विश्वास वाटला. बारा वर्षें खडतर तपश्चर्या केल्या मुळें समर्थांचा हा विश्वास दृढ व अचल असा बनला. तपश्चर्या पुरी केल्या नंतर समर्थांनीं सर्व भरत-खंडभर तीर्थाटन केलें. या मुळें अखिल भरतखंडाच्या निरनिराळ्या प्रांतांतील मानवी समाजाच्या परिस्थितीचें निरीक्षण त्यांना अनायासें घडून आलें; व धर्माच्या उद्धारा करितां परमेश्वर अवतार घेणार, हा त्यांचा विश्वास अधिक च दृढावला. बारा वर्षांचें तीर्थाटन पुरें केल्या वर, समर्थ नासिकनजीक पंचवटीस परत आले. व त्या ठिकाणीं अवतारकार्य कृष्णातटाकीं व्हावयाचें आहे, सबब तिकडे त्वरित जावें अशी श्रीरामांनीं त्यांस आज्ञा केल्या कारणानें समर्थ प्रथम महा-बळेश्वर, वाई येथें अल्पकाळ राहून, चांफळ खोऱ्यांतील शहापूर गांवीं येऊन दाखल झाले. या प्रांतांत आल्या वर समर्थांनीं प्रथम ज्या गोष्टी केल्या, त्या म्हटल्या म्हणजे रामभक्त श्री हनुमान यांच्या मूर्तीची स्थापना व उपा-सना, श्रीरघुनाथ दैवताची उपासना व यांत च अंतर्भूत होणाऱ्या श्रीरामाच्या जन्म तिथीचा उत्सव व रामकथेचा प्रसाद या होत. या गोष्टी करण्यांत रामचरित्राचें रहस्य महाराष्ट्रीय जनतेस पटवून देऊन, त्यांच्या मध्यें श्रीरामा विषयीं भक्ति व निष्ठा उत्पन्न करण्याचा आणि तद्द्वारां स्वधर्मरूपी रामराज्याची स्थापना करण्याचा समर्थांचा हेतु होता हें उघड आहे. प्रस्तुत काळच्या कित्येक पाश्चात्यविद्याविभूषित महाराष्ट्रीयांचा असा ग्रह झालेला आहे कीं, समर्थ रामदास स्वामी हे पोलिटिकल म्हणजे राजकारणी साधु असून, त्यांच्या ठायीं श्रीरामा वर दृढ विश्वास नसतां, श्रद्धावान् व भाविक अशा महाराष्ट्रीय जनतेचीं मनें त्यानीं श्रीरामभक्ती कडे लावून, तद्द्वारां छत्रपतींनीं

आरंभिलेल्या स्वराज्यस्थापनेच्या कार्या विषयीं, महाराष्ट्रांत सहानुभूति उत्पन्न केली. पाश्चात्य शिक्षणाचे संस्कार मनावर घडल्या मुळें व पौर्वात्य संस्कृतीस पारखे झाल्या मुळें श्रद्धाहीन व भावनाहीन बनलेल्या कांहीं लोकांच्या मनांत अशा प्रकारच्या कल्पना याव्या हें ठीक च आहे. परंतु खऱ्या इतिहासलेखकास आगांतुक परिस्थिती मुळें प्रस्तुत काळीं उत्पन्न झालेल्या कल्पना विसरून जाऊन, त्या काळच्या मानसिक वातारणात कल्पनेच्या साह्यानें अधिष्ठित व्हावयाचें असतें; व अशा प्रकारें अधिष्ठित झाल्या वर त्या काळची स्थिति चित्रित करावयाची असते. समर्थ कृष्णातटाकीं आल्या वर त्यांनीं ज्या गोष्टी करण्यास प्रारंभ केला, त्यां पैकीं प्रत्येक गोष्ट रामराज्याची स्थापना करणें हें जें समर्थांचें ध्येय, तें साध्य करण्यास कशी उपकारक झाली, याचें आह्मी अल्प दिग्दर्शन करितों. सतत उद्योग, निरलसता, इष्ट देवतेच्या ठायीं अनन्य भक्ति, अचाट शक्ति आणि शौर्य हे गुण, श्रीहनुमंताच्या ठिकाणीं उत्कटत्वानें वसत असल्याचें, हनुमानचरित्राशीं परिचित असणाऱ्याच्या दृष्टोत्पत्तीस येतें. श्रीदाशरथि रामाच्या पराक्रमाचा पाया मुख्यत्वेंकरून श्रीहनुमान व त्याचे अनुचर जे वानर लोक, यांच्या ठायीं असणाऱ्या वरील गुणा वर उभारिला गेला. समर्थांच्या काळीं रामराज्याची पुनरावृत्ति होण्या करितां हनुमंता सारखे एकनिष्ठ व अचाट शक्तीचे पुरुष महाराष्ट्रांत निपजणं जरूर होतें. ही गोष्ट साध्य होण्या करितां समर्थांनीं निवळ या च हेतूनें उद्युक्त होऊन, श्री हनुमंताच्या मूर्तीची स्थापना अनेक ठिकाणीं केली व त्यांच्या उपासनेचा प्रसार महाराष्ट्रांत केला, असा सकृद्दर्शनीं कित्येकांचा समज होईल. परंतु हा समज सर्वस्वीं सत्य ठरणार नाहीं. श्रीसमर्थांनी ठिकठिकाणीं श्री हनुमानदैवताची स्थापना केली, त्याच्या बुडाशीं त्यांची भावना खालील ओव्यांत दर्शविल्या प्रकारची होती:—

**रघुराज वैकुंठ धामासि गेले । तधीं मारुतीदास हे निरवीले ।**
**रघुनाथ उपासकाला प्रसंगें । सख्या मारुती पाव रे लाग वेगें ॥**
**प्रभूचें माहावाक्य त्वां साच केलें । म्हणे दास हें प्रत्यया सत्य आलें ।**
**जनामाजी हें सांगतां पुरवेना । अवस्था मनीं लागली हे सरेना ॥**

( रा. वि. वि. पान ३३२।३३३ )

या च स्वरूपाचे खालील उद्गार महत्त्वाचे असून लक्षांत ठेवण्या-सारखे आहेत:—

स्वधामासि जातां प्रभू रामराजा ।
हनुमंत तो ठेविला याचि काजा ।
सदासर्वदा रामदासासी पावे ।
खळीं गांजितां ध्यान सोडून धांवे ॥

वरील दोन्ही उताऱ्यां वरून श्रीहनुमानदैवताच्या दैवी सामर्थ्या विषयीं समर्थांचा विश्वास नसतां व या सामर्थ्याचा प्रत्यय त्यांस आला नसतां, त्यांनीं ठिकाठिकाणीं हनुमंतदैवताची स्थापना, महाराष्ट्रजनतेस भुरळ पाडण्या करितां निवळ युक्ति म्हणून केली, असें विधान करणें चुकीचें होईल. समर्थां सारख्या श्रीहनुमंतभक्तांना त्यांचे इष्ट हेतु साध्य होण्यास जसा त्यांच्या कृपेचा उपयोग झाला, त्या च प्रमाणें महाराष्ट्रीय जनतेंत हनुमंताच्या ठिकाणीं असणाऱ्या अनेक गुणांचें संवर्धन होण्यास या दैवताच्या उपासनेचा हि पुष्कळ उपयोग झाला. श्रीसमर्थ रामदास स्वामींची भक्ति श्रीहनुमंता वर खालील वर्णनांत दर्शविलेल्या हनुमंताच्या ठायीं असलेल्या गुणां मुळें जडली होती:—

नवल अवचितां देखिलें । फळ म्हणउनी झेपावलें ।
मंडळ सूर्याचें गिळिलें । बाळपणीं ॥ १ ॥
सेना उदंड मारिली । लंका जाळोनी होळी केली ।
शुद्धि सीतेची आणिली । ख्याती जाली ॥ २ ॥
द्रोणागिरी उत्पाटिला । लाग वेगें झेपावला ।
प्राण सकळांचा रक्षिला । धन्य जाला ॥ ३ ॥
गिरिवरें गर्व केला । पर्वत मैनाक वाढला ।
शून्यमंडळ भेदूनि गेला । तो मारुती ॥ ४ ॥
मोहूर्त रावणें पाहिलें । रघुनाथाला पाचारिलें ।
अरिष्ट स्वामीचें घेतलें । आपणावरी ॥ ५ ॥
रघुनाथाला सोडविलें । पाताळ दैवत मारिलें ।
सेंदुर सर्वांगीं चर्चिलें । तें पासुनि ॥ ६ ॥
\+ + + + + + + + + + + + +
हा तो ईश्वरी अवतार । भीम सकळासी आधार ।
राम ध्यानीं निरंतर । भक्त राज ॥ ९ ॥
राम गेले वैकुंठासी । तें निर्विलें हनुमंतासी ।
तुवां माझिया भक्तासी सांभाळावें ॥ १० ॥
रामदासाचा सारथी । विघ्नें चळचळा कांपती ।
पावे संकटीं मारुती । भवंशानें ॥

(श्री रा. वि. वि. पान ३२१)

अशा प्रकारचे गुण ज्या हनुमंताच्या ठायीं होते, त्या हनुमंताची उपासना समर्थांच्या शिकवणी मुळें महाराष्ट्रांतील लोक करूं लागले व हनुमंताच्या ठायीं असलेल्या गुणांचें अनुकरण करण्याची प्रवृत्ति, महाराष्ट्रीय जनते पैकीं हनुमंताच्या कित्येक निःसीम भक्तांच्या ठायीं उदयास आली. जेधे व बांदल देशमुखांनीं स्वतःस हनुमंतअंगदाची जी उपमा लावून घेतली आहे (भा. इ. सं. मं. शके १८३८ सं. वृत्त पान १८) त्या वरून त्यांच्या गुणांचें अनुकरण करावें अशी भावना त्या काळीं महाराष्ट्रांत वावरत होती, हें स्पष्टपणें सिद्ध होतें. श्रीहनुमंतदैवताच्या उपासनेचा श्रीसमर्थांनीं जो प्रसार केला, त्याच्या च योगानें महाराष्ट्रांत ही भावना उत्पन्न झाली असली पाहिजे, असें सहज अनुमान निघतें. या एका लहानशा उदाहरणा वरून ज्या हनुमंतदैवताच्या उपासनेचा प्रसार समर्थांनीं महाराष्ट्रांत केला, ती छत्रपति शिवाजी महाराजांनीं स्वराज्यस्थापनार्थ चालविलेल्या प्रयत्नास किती उपकारक होत असली पाहिजे, याची कल्पना करणें कठीण नाहीं.

कृष्णातटाकीं समर्थ वास्तव्य करूं लागल्या नतर थोड्या च दिवसांनीं श्रीहनुमंतदैवताची स्थापना कित्येक ठिकाणीं केल्या वर श्रीदाशरथि रामाचा जन्मोत्सव करण्याची कल्पना त्यांच्या मनांत आली. मसूर येथें वास्तव्य करण्या करितां समर्थ आल्या नंतर त्यांनीं श्रीरामजन्मोत्सव करण्याचें ठरविलें. श्रीराम हें समर्थांचें कुलदैवत असल्याचें सर्वश्रुत च आहे. समर्थ रामदास हे श्रीरामाचे निःसीम उपासक होते व हनुमंतदैवताच्या उपासनेचा प्रसार ज्या प्रमाणें त्यांनीं महाराष्ट्रांत केला, त्या च प्रमाणें त्यांचें कुलदैवत जें श्रीरघुनाथ, त्यांच्या उपासनेचा हि प्रसार त्यांनीं महाराष्ट्रीय जनतेंत केला. श्रीरामाच्या उपासनेचा प्रचार समर्थांनीं महाराष्ट्रांत कोणत्या भावनेनें केला, याची यथायोग्य कल्पना देण्या करितां आम्ही समर्थांचे खालील उद्गार येथें देतों:—

**आमुचे कुळीं रघुनाथ । रघुनाथें आमुचा परमार्थ ।**
**जो समर्थाचाही समर्थ । देवां सोडविता ॥**
**त्याचे आम्ही सेवकजन । सेवेकरितां जालें ज्ञान ।**
**तेथें अभाव धरितां पतन । पाविजेल कीं ॥**
**करी दुर्जनाचा संव्हार । भक्त जनासी आधार ।**
**ऐसा तो हा चमत्कार । रोकडा चाले ॥**
**मनीं धरावें तें होतें । विघ्न अवघेंची नासोन जातें ।**
**कृपा केलिया रघुनाथें । प्रचित येतें ॥**

रघुनाथभजनें ज्ञान जालें। रघुनाथभजनें महत्त्व वाढलें।
म्हणोनिया तुवां केलें। पाहिजे आधीं ॥

श्रीरघुनाथकृपेनें सर्व विघ्नांचा नाश होतो, तिचें योगानें स्वतःस ज्ञान होऊन महत्त्व वाढलें, सबब रघुनाथाची उपासना करा असा समर्थांनीं महाराष्ट्रीय जनतेस उपदेश केला. निवळ ध्येय या नात्यानें श्रीरघुनाथोपासना राष्ट्रोन्नतीस उपकारक आहे, सबब तिचा लोकांनीं आश्रय करावा अशी समर्थांची भावना नव्हती. आता श्रीरघुनाथदैवताच्या ठिकाणीं महाराष्ट्रीय जनतेचीं मनें जडण्या करितां श्रीरामजन्मोत्सव व रामकथाप्रसार या ज्या दोन गोष्टी समर्थांनीं केल्या, त्यां पैकीं रामकथेचा महाराष्ट्रीय जनतेंत प्रसार करून ती लोकांस कशा रीतीनें प्रिय होईल या विषयीं समर्थांनीं कोणत्या मार्गाचें अवलंबन केलें, या संबंधाचें थोडें बहुत विवेचन करूं. समर्थ रामदास स्वामींच्या ग्रंथांचा ज्यांना उत्तम प्रकारचा परिचय झाला आहे, त्यांच्या पक्केपणें निदर्शनास येईल कीं, श्रीदाशरथि राम अवतार घेऊन धर्मोद्धाराचें कार्य महाराष्ट्रांत रामराज्याची स्थापना करून करणार आहेत, अशी रामदासांची खरीखुरी, जिवंत व जाज्वल्य भावना होती. या भावनेस अनुसरून श्रीरामजन्मोत्सवाबरोबर च रामकथेचा प्रसार महाराष्ट्रातील जनतेंत करण्यास समर्थांनीं सुरवात केली; समर्थ रामदासांच्या व त्यांच्या सांप्रदायांतील महंतांच्या वाङ्मयाच्या अभ्यासकांस जी एक गोष्ट ठळक रीतीनें निदर्शनास येते ती ही की, महाराष्ट्रांत रामदास अवतीर्ण होण्या पूर्वी जे जे धार्मिक सांप्रदाय उदयास आले, त्या सांप्रदायांच्या संस्थापकांनीं अथवा त्यांच्या अनुयायांनीं रामकथावाङ्मय जितकें निर्माण केलें, त्याच्या किती तरी अधिक पटींना समर्थसांप्रदायिकांनीं तें निर्माण केलें आहे; याचें कारण उघड असें आहे कीं, समर्थांचें ध्येय रामराज्य निर्माण व्हावें असें असल्याकारणानें, महाराष्टीय जनतेत रामकथेचा प्रसार करण्या स्तव रामकथावर्णनपर वाङ्मय निर्माण करण्या वांचून रामदास अगर त्यांचे अनुयायी याना गत्यंतर नव्हतें. आतां स्वराज्यस्थापने प्रीत्यर्थ रामराज्यस्थापना हें जें समर्थ रामदासांचें ध्येय, त्यास रामकथा कशी पोषक झाली याचा उलगडा समर्थांच्या खालील उद्गारां वरून उत्तम प्रकारें होणार आहे. समर्थांचा जन्म ज्या काळीं महाराष्ट्रांत झाला त्या काळीं महाराष्ट्रांतील लोकांची स्थिति समर्थकृत रामायणांत वर्णिलेल्या रावणाच्या बंदींतील देवांच्या स्थिती सारखी झाली होती. हनुमंतास रावणाच्या बंदींतील देव खालील प्रमाणें दिसले:—

**हिणासारखे देव ते दीन झाले। नसे शक्ति ना युक्ति पोटीं गळालें।
भयाभीत ते कांपती दैन्यवाणे। बहु गांजिले दुःख ते कोण जाणे॥**
(रा. क. पा. ४०)

रामदासांच्या या ओव्यांत वर्णिल्या प्रमाणें महाराष्ट्रांतील लोकांची दैना झाली असतां, त्यांच्या वर राज्य करणाऱ्या मुसलमान राज्यकर्त्यांची मनोरचना कोणत्या प्रकारची होती, याचें वर्णन समर्थांच्या खालील ओव्यांत आलें आहे, तें लक्षांत ठेवण्यासारखें आहे.

**भय सांगतां त्या नरावानरांचें। सदासर्वदा भक्ष जें राक्षसांचें।
मज रावणासारिखा कोण आहे। समरंगणीं काळ भीडो न राहे॥**
(रा. क. पा. ४१)

महाराष्ट्रांत त्या काळीं अस्तित्वांत असलेल्या अशा प्रकारच्या स्थितींत शंकर, चंडिका, मोरया, व्यंकटेश, भैरव, नृसिंह, वामन, भार्गव, कौरव, पांडव इत्यादिकांच्या कथा पुराणातरीं वर्णिलेल्या असताना, या सर्वां पेक्षां रामकथा समर्थांना अधिक श्रेष्ठ व प्रिय वाटत असे यांचा खालील ओव्यांत समर्थांनीं केलेला खुलासा लक्षात ठेवण्यासारखा आहे:—

**जेणें फेडिला पांग ब्रह्मादिकांचा। बळें तोडिला बंद त्या ईदशांचा।
म्हणोनि कथा थोर त्या राघवाची। जनीं ऐकतां शांत होते भवाची॥**

राघवानें देवांना रावणाच्या बंदिवासाच्या जाचातून सोडविलें म्हणून रामाची कथा इतर सर्व देवतांच्या कथां पेक्षां श्रेष्ठ आहे असें समर्थांचें मत होतें. महाराष्ट्रा वर त्या काळीं राज्य करणारे मुसलमानधर्मी राज्यकर्ते समर्थांना रावणकाळचे राक्षस भासत असत. आनंदवनभूवन अथवा भविष्यपुराण या नांवाचें समर्थांचें जें प्रकरण आहे (रा. क. भा. १ ला पान ४११) त्यातील खालील ओव्यांवरून समर्थांचा हा समज स्पष्ट होत आहे:—

**कल्पांत मांडला मोठा। म्लेंछ दैत्य बुडावया।
कैपक्ष घेतला देवीं। आनदवनभूवनी॥
बुडाले सर्वही पापी। हिंदुस्तान बळावलें।
अभक्तांचा क्षयो जाला। आनंदवनभूवनीं॥
पूर्वी जे मारिले होते। ते चि आतां बळावले।
कोपला देव देवांचा। आनंदवनभूवनीं॥ २९॥**



रामदास स्वामींच्या म्लेंछां विषयींच्या ज्या प्रकारच्या कल्पना होत्या, तशाच प्रकारच्या त्या काळच्या इतर लोकांच्या शिवाजी महाराजां संबंधाच्या कल्पना

होत्या, त्या लक्षांत ठेवण्या सारख्या आहेत. जेधे शकावलींत अफजलखानाच्या वधा संबंधीं जें वर्णन आलेलें आहे त्या वर्णनांतील खालील उद्गार फार महत्त्वाचे व मननीय आहेत.

हनुमंत अंगद रघुनाथाला । जेधे बांदल शिवाजीला ॥

( भा. इ. मं. च. स. पा. १७६ )

थोडक्यांत सांगावयाचें म्हणजे महाराष्ट्रांत त्या काळीं रामरावणकाळाची पुनरावृत्ति शिवाजी व औरंगजेब यांच्या रूपानें होत आहे, अशी अखिल महाराष्ट्रीयांची भावना असल्याचें स्पष्ट दिसून येतें; व या मुळें च रामकथा समर्थांना सर्व कथांत श्रेष्ठ व अधिक प्रिय वाटत असे. महाराष्ट्रांतील सर्व लोकांस म्लेंछरूपी राक्षसांच्या दास्यांतून मुक्त करून स्वराज्य रूपी रामराज्यांत अधिष्ठित करावयाचें, ही आकांक्षा प्रत्येक महाराष्ट्रीयाच्या अंतःकरणांत उत्पन्न करून, रामराज्याची स्थापना करण्या करितां त्या काळीं पुढें सरसावलेल्या शिवाजी सारख्या क्षत्रिय राजास सर्वतोपरी साह्य करण्यास त्यांनीं प्रवृत्त व्हावें, हा रामराज्यस्थापनेचें ध्येय महाराष्ट्रीय जनते पुढें मांडण्यांत समर्थांचा मुख्य हेतु होता. हा हेतु पार पाडण्या करितां खुद्द समर्थ व त्यांचे महंत यांनीं रामकथा लिहून तिचा प्रसार महाराष्ट्रीय जनतेंत केला व तिचीं अंतःकरणें छत्रपति शिवाजी महाराजां विषयीं एकनिष्ठ बनविलीं. कोणत्या हि प्रदेशांतील प्रचलित राजसत्ता उलथून पाडून, त्या ठिकाणीं दुसरी राज्यसत्ता प्रस्थापित करण्या करितां ज्या अनेक हालचाली कराव्या लागतात, त्यां पैकीं एक महत्त्वाची हालचाल म्हटली म्हणजे प्रचलित राज्यसत्तेचा अंमल ज्या लोकां वर चालू असेल, त्यांच्या मनांत तिज विषयी तिरस्कार उत्पन्न करून ती त्यांना द्वेष्य वाटावयास लावणें, व नूतन स्थापित होणाऱ्या सत्ते विषयीं प्रेम व आदर उत्पन्न करणें, ही होय. शिवकालीन महाराष्ट्रांत आतां नमूद केलेल्या तत्त्वाच्या दृष्टीनें जें कार्य करणें जरूर होतें, तें करण्याचें श्रेय सर्वस्वी समर्थ रामदास स्वामींना च दिलें पाहिजे. समर्थांची " उदास वृत्तीस मानवे जन । विशेष कथा निरूपण । रामकथा ब्रह्मांड भेदुन । पैलाड न्यावी ॥ " ( दा. १२-९-२६ ) अशी यत्नसिकवणनाम समासांत एक उक्ति आहे; या उक्तींत दर्शविल्या प्रमाणें सर्व महाराष्ट्रभर रामदासांनीं रामकथेचा घोष करून सोडिला. समर्थांनीं स्वतः रामकथा वर्णिल्याचा वर उल्लेख केला च आहे; रामकथा स्वतः वर्णून समर्थ स्वस्थ बसले नाहींत. त्यांच्या शिष्यांच्या करवीं

त्यांनीं हें कार्य बऱ्या च मोठ्या प्रमाणावर केले आहे. समर्थांनीं केलेल्या या कार्याचें स्वरूप समर्थ प्रतापांतील खालील ओंव्यांवरून चांगलें लक्षांत येण्या सारखें आहे.

**समर्थ देवें वेणाबाईस वरदानें दिधलीं । सीता स्वयंवरें रामायणें वदविलीं । रामकथा ब्रह्मांड भेदूनि नेली । पैलिकडे समर्थें ॥ ४ ॥**
**मंगलरामायणें छंदोरामायणें । संकेतरामायणें लवकुश रामायणें ।**
**सुंदर रामायणें अब्द रामायणें । भाषारामायणें वदविलीं ॥**

( स. प्र. पान ७१ )

तंजावर कडे समर्थांचे जे शिष्य गेले त्यांनीं केलेल्या ग्रंथांत माधवकृत रामायणाची सात कांडें मराठींत लिहिलेलीं उपलब्ध झालीं आहेत. या खेरीज त्या प्रांतांतील दुसऱ्या कांहीं शिष्यांनीं रामायणा वर मराठी भाषेंत कांहीं ग्रंथरचना केली आहे. समर्थांनीं केलेल्या या रामकथेच्या घोषाच्या योगानें महाराष्ट्रांतलि कित्येक लोक रघुनाथभजनीं लागून रघुनाथाचें निःसीम भक्त बनले व समर्थांना रघुनाथभक्तीचा ज्या प्रकारचा प्रत्यय आला, तशा प्रकारचा प्रत्यय त्यांना हि येऊं लागला. समर्थशिष्य देवदास यांनीं केलेल्या अष्टकांतील खालील उद्गारां वरून रामदासांच्या शिष्यांचे ठिकाणीं श्रीरामा विषयीं कोणत्या प्रकारची भावना वसूं लागली होती हें दिसून येतें.

**क्षयो दुर्जनाचा करी कोप आतां । शिरीं रामराया असे काय चिंता ।**
**असे निश्चय या मनाच्या स्वभावें । रघुनायका जें कळे तें करावें ॥ १**
**नसे ज्ञान मी नेणता दास तूझा । रघूनायकें घेतला भार माझा ।**
**बरें जें घडे तें घडो या देहाला । परी मी न सोडीं कदा राघवाला ॥ २**
**पडो हा झडो हा देहो जायना का । बहुकाळ कल्पांत तो होय ना का**
**जऱ्ही सोमसूर्यादिकां अंत झाला । परी मी न सोडीं कदा राघवाला ॥ ३**

\+ \+ \+ \+ \+ \+ \+

**म्हणोनी मनीं लोक हेवा नसावा । करावा रघूनायकाचा च धांवा ।**
**दिना कारणें राम हा पावताहे । दिनांचें उणें तें तयाला न साहे ॥ ५**

( सा. वि. वि. पान २३४ )

महाराष्ट्रांत नुसता रामकथेचा घोष करून स्वस्थ न बसतां रामदासांनीं रघुनाथाचें भजन करणारे अनेक सेवक महाराष्ट्रांत निर्माण केले व समर्थां प्रमाणें ते हि दुर्जनांचा संहार करून भक्तजनांस आधार होण्या विषयीं श्रीरघुनाथाची प्रार्थना करूं लागले.

आतां समर्थांच्या हालचाली स्वराज्यस्थापनेस कशा रीतींनें पोषक होत, या संबंधाची आणखी एक महत्त्वाची बाजू आह्मी दिग्दर्शित करितों. राष्ट्रोन्नती स्तव कोणती हि हालचाल तत्काळ फलदायी होईल अशी करावयाची असल्यास, ती प्रचंड स्वरूपाची करावी लागते. ही हालचाल सतत सुरू ठेवण्या करितां अनेक निःस्वार्थी व कर्तृत्ववान् लोकांची जरूरी असते. छत्रपति शिवाजी महाराजांनीं अपार द्रव्य संपादून त्यांच्या कार्यास उपयोगी पडणारीं शेंकडों गुणी व कार्यकर्ती माणसें, द्रव्याचा मोबदला देऊन आपले पदरीं बाळगिलीं. छत्रपतींचा हा लक्षाधिपतींचा मार्ग झाला; समर्थांनीं भिक्षाधिपतीचा मार्ग पत्करला. स्वतः समर्थ वैयक्तिक स्वार्थाचा त्याग करून ज्या प्रमाणें रामराज्याच्या ध्येया स्तव महाराष्ट्राचे सेवक बनले होते, त्याच प्रमाणें आचरण करणारे शेंकडों निःस्वार्थी लोक समर्थांच्या ध्येया प्रीत्यर्थ खटपट करणारे व समर्थां पासून एका कवडीची हि अपेक्षा न करणारे कार्यकर्ते पुरुष, त्यांचे शिष्य झाले. या संबंधाचे कांहीं थोडे महत्त्वाचे उल्लेख आम्ही येथें देतों:—

**समर्थांपासूनि अनंतमूर्ती । शिष्य संतानें चालिली ।**
**समर्थें कित्तेक गुप्त शिष्य केले । ते ते समर्थांसी विदित भले ।**
**भरतखंडीं प्रगट जे जाले । तें तें निवेदन करूं ग्रंथार्थी ॥**

समर्थांचे हे गुप्त व प्रगट असे अनंत शिष्य भरत खंडाच्या कोणकोणत्या प्रांतांत वसती करून राहिले होते, याची कल्पना येण्या करितां त्या प्रांतांचीं नांवें आह्मी येथें देतों :-

गोदातीर, कृष्णातीर, अरुणाचलप्रांत, दाक्षिणप्रांत, नगरप्रांत, तापीपूर, वऱ्हाड देश, दंडाराजापुरी, तळ कोंकण, सुरत प्रांत, देवगड प्रांत, रामटेक प्रांत, गोमंत प्रांत, गोकर्ण प्रांत, त्रिवेणीतीर, अंतर्वेदी, अयोध्यापूर, मथुरापूर, मायापूर, काशी, कांची, अवंतिका, द्वारका, बद्रिकेदार, सोरटी, उज्जनीपूर, आऊंढागिरी, शेषाद्रि, शैल्यशिखर, भीमाशंकर, पर्यळीनगरी, घुष्मेश्वर, देवगिरी, रामेश्वर, मल्याळ, अंनतशयन, सैह्याद्रिशिखर, नासिकप्रांत. या शिवाय समर्थांच्या शिष्यांचे अनेक शिष्य निरनिराळया प्रांतांत होते, ते निराळेच ! वेणाबाईच्या शिष्यां संबंधीं खालील उल्लेख समर्थ प्रतापांत आढळतो:—

**वेणाबाई पासूनि कितेक महंत जाले । उत्तर भूमीसी नद्भुदा गेले ।**
**त्रिवेणी अंतर्वेदी राहिले । अयोध्या समीप करूनियां ॥**

( स. प्र. पान ७२ )

भौगोलिक दृष्ट्या पाहिलें तर असें दिसून येतें कीं, समर्थशिष्यांनीं सर्व भरतखंड व्यापून टाकिला होता. समर्थांच्या शिष्यांच्या ठायीं कोणकोणत्या प्रकारचे गुण असत याची कल्पना येण्या करितां, खालील ओव्या आम्ही येथें देतोंः–

समर्थ स्वामी आदि पुरुष । अवतार सामर्थ्यें विशेष ।
अनंत महंत माहापुरुष । विद्यमान समर्थी जाणविले ॥ १ ॥
कित्तेक शिष्य सदाचारी । कित्तेक शिष्य राज्याधिकारी ।
कित्तेक शिष्य राजधारी । देशाधिकारी कित्तेक ॥ २ ॥
नाना पर्वतदुर्गी शिष्य केले । नाना भूमिदुर्गी शिष्य केले ।
नाना सिंधु दुर्गी शिष्य केले । सद्गुरुनाथ समर्थें ॥ ३ ॥
गुप्त प्रगट भरत खंडीं । माहापुरुष असती उदंडी ।
यावद्माया विस्तार ब्रह्मांडीं । तावत् परंपरा सामर्थ्यें ॥ ४ ॥

( स. प्र. पान ७३ )

मुख्य समर्थापासूनि अनुगृहीत जाले ।
विख्यात महंत किंचित निवेदिले ।
महंती महंत कित्तेक वाढविले ।
असंख्यात संख्या असेना ॥ ८ ॥
नाना कंथा मेखला कुर्मुजी घालिती ।
नाना पर्णभक्षक पर्णे भक्षिती ।
समर्थ ग्रंथराज दासबोध सन्निध असती ।
भिक्षा दीक्षा उपासना ॥ ९ ॥
अनंत ब्रह्मांडीं पुरुष जाले ।
अनंत ब्रह्मांडें व्यापूनि ठेले ।
अनंत ब्रह्मांडीं प्रगटले ।
जगदोद्धार करावया ॥ १० ॥

( स. प्र. पान ७४ )

समर्थप्रताप ग्रंथांत समर्थांच्या प्रगट शिष्यांचीं नांवें नमूद आहेत; तीं एकंदर ८६ आहेत. या शिवाय समर्थांचे मुख्य शिष्य जे कल्याण, त्यांच्या शिष्यांच्यीं एकंदर पंचवीस नांवें दिलीं आहेत. या शिवाय प्रमुख शिष्य सांप्रदायिकांचीं व स्त्री शिष्यिणींचीं नांवें अनुक्रमे १३ व १८ समर्थप्रतापांत नमूद केलेलीं आढळतात. विस्तारभया स्तव हीं सर्व आम्ही येथे दिलीं नाहीत. जिज्ञासु वाचकांस तीं समर्थप्रतापग्रंथांत आढळतील. समर्थांच्या या अनेक शिष्यांच्या ठायीं कोणकोणते विशिष्ट गुण वसत होते, त्या च प्रमाणें त्यांच्या कडे समर्थ कोणतीं कार्यें सोंपवीत व हीं कार्य करण्याची पात्रता त्यांच्या ठायीं

कितपत असे इत्यादि बाबीं संबंधीं वाचकांस यथायोग्य कल्पना येण्या स्तव समर्थ प्रतापांत शिष्यांचा नामनिर्देश करितांना, त्यांचे गुण दर्शविणारीं जीं विशेषणें नमूद केलीं आहेत, त्यांचें आम्हा येथें दिग्दर्शन करितों.

" अनुष्ठानी, ग्रंथ विस्तार करणारे, लोकांस भजनमार्गास लावणारे, परमार्थविस्तार करणारे, मोठमोठ्या यात्रा भरविणारे, गुरुचरणीं वास करणारे, ग्रंथ निवरण करणारे, संकीर्तन करणारे, विरक्त, पुराणिक, वैदिक, वेदांत प्रतिपादन करणारे, शास्त्रानुसार बोध करणारे, आत्मचर्चा करणारे, गुरुभजनी, ग्रंथपारायण करणारे, समुदाय करणारे, शुद्ध परमार्थ वाढविणारे, पंडित, चाफळ व सज्जनगड यां वर परप्रांतांतून यात्रा आणणारे, शास्त्रमार्गानें व स्वधर्ममार्गानें जाणारे,युगधर्मशोधक,कीर्तनकार,बागबागायत करणारे,मोक्षदाते,गुरुप्रताप वर्णन करणारे, श्रीरामसंकीर्तन करणारे, जगोद्धार करणारे, कौपिनी अनुष्ठानी, मारुति अर्चन करणारे, नाना राजकारण दीर्घ सूचना करणारे, ललिताभिमानी, ग्रंथलेखक व शुद्ध लेखक, " इत्यादि गुणांनीं युक्त असे श्रीसमर्थांचे शिष्य होते. समर्थसांप्रदायांत प्रविष्ट झाल्या वर कोणत्या प्रकारचें शिक्षण देण्यांत येत असे, याचें किंचित् दिग्दर्शन प्रस्तुत काळीं करणें जरूर आहे. समर्थांच्या रामराज्यस्थापनेच्या ध्येयाच्या सिध्यर्थ महाराष्ट्रीय जनतेची मनोभूमि, समर्थांना त्या काळीं अनुकूल करून घ्यावयाची होती; हें कार्य साध्य होण्या करितां त्यांनीं अनेक महंत व मठ निर्माण केले. ह्या महंताच्या द्वारें समर्थांच्या इष्ट कार्याची सिद्धि होण्या स्तव त्यांच्या ठिकाणीं श्रेष्ठ प्रकारची योग्यता येणें जरूर होतें. ही योग्यता येण्या करितां पुढील ओव्यांत दर्शविल्या गुणांचें, समर्थांच्या महंताच्या ठायीं संवर्धन करण्याचा प्रयत्न करण्यांत येत असे:—

**प्रथम लिहीणें दुसरें वाचणें । तिसरें सांगणें अर्थांतर ।**
**आशंकानिवृत्ती ऐसी चौथी स्थिती । पांचवी प्रचीती अनुभवें ॥**
**साहावें तें गाणें सातवें नाचणें । ताळी वाजवणें आठवें तें ।**
**नवां अर्थ भेद दहावा प्रबंध । आकावा प्रबोध प्रचीतीसीं ॥ ४ ॥**
**बारावें वैराग्य तेरावा विवेक । चौदावा तो लोक राजी राखे ।**
**पंध्रावें लक्षण तें राजकारण । सोळावें तें जाण अवेग्रता ॥**
**प्रसंग जाणावा तो गुण सत्रावा । काळ समजावा सर्वां ठाईं ॥**
**आठ्रावें लक्षण वृत्ति उदासीन । लोलंगता जाण तेथें नाहीं ॥**
**येकोणीसावें चीन्ह सर्वांसी समान। राखे समाधान ज्याचें त्याचें ।**
**विसावें लक्षण रामउपासना । वेध लावी जना भक्तीरंगें ॥**

( रा. क. प्र. पान ६२ )

वरील ओव्यांत नमूद केलेले गुण लोकोत्तर आहेत. या गुणांनीं युक्त असलेल्या व्यक्तीचें वजन जनते वर स्वाभाविकपणें पडत असे. रामदासी संप्रदायाचें जें वाङ्मय "रामदास आणि रामदासी" मासिकद्वारें प्रसिद्ध झालें आहे, त्यांत समर्थांच्या कित्येक शिष्यांच्या चरित्रां संबंधीं थोडी फार माहिती उपलब्ध झाली आहे; ती वरून समर्थांच्या कित्येक शिष्यांच्या ठायीं वरील गुण वसत असल्याचें आढळून येतें. वरील गुणां पैकीं विसावे गुणांत रामउपासना व तद्वारें जनतेचीं मनें आकर्षून घेणें, हें जें लक्षण नमूद केलें आहे, तें फार महत्वाचें असून रामराज्यस्थापनेचें ध्येय साध्य करण्यास फार उपयुक्त असें होतें. या गुणाच्या जोरावर समर्थांच्या शिष्यांनीं "राजा शिवाजी प्रभु रामराजा" ( रा. वि. वि. पान ३११ ) कडे महाराष्ट्रांतील सर्व लोकांचीं अंतःकरणें वेधून घेऊन, स्वराज्य स्थापनेचें कार्य सुकर करून दिलें. आतां दर्शविलेल्या अनेक गुणांनीं युक्त अशा समर्थांच्या शिष्यां पैकीं कांहीं शिष्य "जनीं जनार्दनीं मिळोन" जाण्या करितां रामजन्मोत्सवानिमित्त मोठमोठ्या यात्रा भरवीत व चाफळ अगर सज्जनगड येथें परप्रांतातून यात्रा घेऊन येत असत. समर्थ प्रतापाच्या दहाव्या समासांत अशा प्रकारच्या एकंदर सात शिष्यांचा नामनिर्देश केला आहे. या शिष्यांचीं नावें व ते ज्या प्रांतात यात्रा भरवीत अगर ज्या प्रांतांतून चाफळ क्षेत्रांत यात्रा आणीत त्यांचीं नांवे खालील ओव्यांत समर्थप्रतापकारांनीं दर्शविलीं आहेतः—

**उद्धवनामा पट्टाभिमानी । पूर्वपश्चिम गोदातीर अवनी ।**
**उत्कट यात्रा चालवी जनीं । श्रीगुरुचरणीं मर्यादे ॥**
**हरि बंधु महादेव शक्ति अलय भूवनी । मारुति अर्चनी वैभवभजनी ।**
**उत्कट यात्रा आणिली अधिष्ठानीं । समर्थनयनीं संतोषविती ॥**
**मुरारीनामा नारायणपिता । बाहो क्षत्रीं प्रांतींची यात्रा आणिता ।**
**बाहो क्षत्रासमीप नाम गावडा । निपुत्रिक सुपुत्रिक केला रोकडा ।**
**अष्टपुत्रेंसीं पावे ढोल घडघडां । वाजवीत यात्रा आणितसे ।**
**नामसेटीची यात्रा तुंबळ । बादली तकटीं निशाणें सकळ ।**
**नाना उंच शासनें श्वातु बंदी केवळ । दीक्षा प्रांतासी ।**
**कृष्णनामा तापीपुरी । उत्कट परमार्थ लोकीं विस्तारीं ।**
**सद्गुरुकृपें जग उद्धरीं । यात्रा भरी देवाची ॥**
**चाफळीं केशवस्वामी नदीतटरचना । नाना कार्यभागाची विवंचना**
**नानाराजकारण दीर्घसूचना । जनार्दन महाराष्ट्र यात्रा आणितसे ॥**

वरील ओव्यांत दर्शविलेले शिष्य हे प्रचंड यात्रा भरविणारे व चाफळास यात्रा आणणारे होते. या ज्या यात्रा भरविण्यांत येत, त्या रामनवमीच्या दिवशीं रामजन्मोत्सवा निमित्त भरविण्यांत येत असत. यात्रे निमित्त निरनिराळ्या प्रांतांतील असंख्य लोक जमविण्यांत समर्थ व त्यांचे वरील शिष्य यांचा विशिष्ट प्रकारचा हेतु असे; या हेतूचा खुलासा खालील ओव्यांत केलेला आढळतो.

**" नाना रथोत्छाह मांडले देवाचे। नाना देशांतरी लोक आले वैभवाचे नाना लोकीं लोक वाढविले साचे। चाफळ पर्यळीं अधिष्ठानीं ॥**

[ स. प्र. पान १२९ ]

या ओव्यांत वार्णिल्या प्रमाणें जे असंख्य लोक येत, त्यांतील प्रमुख व वजनदार लोकांना समर्थ व त्यांचे शिष्य रामराज्यस्थापनेचें जें त्याचें ध्येय, तें पटवून देऊन त्या ध्येयाचे त्यांस नि:सीम भक्त बनवीत; व अशा रीतीनें रामराज्य-भक्तांचा समुदाय वृद्धिंगत करीत. स्वराज्यस्थापनेच्या कार्यास समर्थांच्या या हालचालीं मुळें उत्तम प्रकारची मदत होऊं लागली. या मुळें

**" जव जव शिवराज्य वर्धमाने। तव तव रामभजनासी ग्राम प्रदानें। राजा ब्रह्मराम अनुसंधानें। राजश्रिया विराजत ॥ "**

( स. प्र. पान १२५ )

यांत वर्णन केल्या प्रमाणें शिवाजी महाराजां कडून समर्थांच्या हाल-चालींचें पोषण होऊं लागलें. श्रीसांप्रदायाचे कागदपत्र ( रामदास आणि रामदासी माला भाग ९ ) या ग्रंथात जीं पत्रें छापिलीं आहेत त्या पत्रांमध्यें कित्येक स्थळीं

" राजश्री कैलासवासी स्वामीस श्रीचें वचन आहे कीं, श्री देवाचा चढता वाढता महोछाव चालवावा तैसेंच चढतें वाढतें राज्य अभिवृद्धीतें पावेल हें श्रीचें कृपापूर्वक आसीर्वादरूप वाक्य आहे " ( पान ३१ )

अशा स्वरूपाचे बरे च उल्लेख आले आहेत. या उल्लेखांत श्रीरामाच्या चढत्या वाढत्या उत्सवाचे कार्य म्हणजे छत्रपति शिवाजी महाराजांच्या राज्याची वृद्धि, असा कार्यकारणसंबंध दर्शविला आहे. हा कार्यकारणरूपसंबंध यात्रे करितां येणाऱ्या असंख्य लोकांचीं मनें रामराज्याच्या ध्येया कडे आकर्षून घेण्याचा जो प्रचंड खटाटोप समर्थ व त्यांचे शिष्य यांच्या कडून केला जात असे, त्याच्या योगानें च संभवणें शक्य आहे.

गिरिधरांनीं समर्थ रामदासा विषयीं श्रीसद्गुरुस्तवनपर रचिलेलें एक पद प्रसिद्ध आहे. त्या पदातील खालील चरणां वरून त्या काळीं रामजन्मोत्सव कोणत्या हेतू स्तव प्रचंड प्रमाणा वर करण्यांत येत असत हें स्पष्टपणें सिद्ध होत आहे:—

**स्वधर्मरक्षणीं प्रेम ज्यासी मोह छायाचे ।**
**ज्यासी रामोपासक गिरिबाळक शरणागत त्याचें ॥**

या पदांत महोत्सवा बद्दल समर्थांचें प्रेम स्वधर्मरक्षणा स्तव असल्याचें गिरिधरानें स्पष्टपणें नमूद केलें आहे.

रामराज्याच्या ध्येया कडे ह्मणजे छत्रपति शिवाजी महाराजांनीं स्थापिलेल्या स्वराज्या कडे महाराष्ट्रीय जनतेचीं मनें आकर्षून घेऊन त्या वर तीं रत करणें या शिवाय स्वराज्यास पोषक असे कांहीं कार्य, सर्व भरतखंडभर पसरलेले अनेक समर्थशिष्य करीत असत कीं काय हा हि प्रश्न, समर्थांनीं अस्तित्वांत आणलेल्या प्रचंड संघटनेचें स्वरूप लक्षांत घेतां, आपल्या मनांत आल्या वांचून राहत नाहीं. समर्थांचे, निरनिराळ्या प्रदेशात, त्या च प्रमाणें डोंगरी किल्ले, समुद्रकांठचे किल्ले, भुइकोट किल्ले इत्यादि ठिकाणीं वसती करून असणारे शिष्य, शिवाजी महाराजानीं आरंभिलेल्या स्वराज्यस्थापनेच्या कार्यास वर दर्शविलेल्या बाबीं खेरीज आणखी एक महत्त्वाची उपकारक अशी कामगिरी करीत असत. ही कामगिरी म्हटली म्हणजे परराज्यांतील बिनचूक माहिती शिवाजी महाराजांस अगर त्यांचे अधिकाऱ्यांस त्वरित पुरविणें ही होय. आपल्या सैन्याच्या हालचाली करण्याच्या बाबतींत अगर परचक्राची भीति उत्पन्न झाली असतां, स्वराज्यांतील मुलखाच्या अगर स्वतःच्या संरक्षणाच्या बाबतींत वेळेवर योग्य वाटणाऱ्या तजविजी करण्यास, वरील बातमी शिवाजी महाराजांस फार च उपयोगी पडत असे. समर्थांचे शिष्य जे केशवस्वामी यांचें समर्थप्रतापकारानें "नाना कार्यभागाची विवंचना। नाना राजकारण दीर्घसूचना।" असें वर्णन केलें आहे; त्या च प्रमाणे समर्थप्रतापांत ( पा. १४० ) समर्थ शिष्यां विषयीं खालील प्रमाणें वर्णनपर ओव्या आढळतात.

**नाना देशकाळें प्रसंगें । नाना राजयोगें नाना राजकारणें करिती ।**
**नाना अध्यात्मग्रंथीं विवरणें विवरती । विवेक विचारें परमार्थें ५२**

या ओव्यांतील "नाना राजकारणें" करणारे समर्थांचे शिष्य असत असें स्पष्ट सिद्ध होतें. या उल्लेखां वरून समर्थ रामदास स्वामींचे शिष्य, छत्रपति शिवाजी महाराजांस राजकारणात बहुमोल मदत करीत असत, ही गोष्ट

निर्विवादपणें सिद्ध होत आहे. दासविश्रामधाम भाग १ ला पान २१६ मध्यें या मुद्याच्या चर्चेच्या दृष्टीनें एक महत्त्वाचा उल्लेख आला आहे, तो आम्ही येथें नमूद करितों. दासविश्रामधामकाराने औरंगजेबाची समर्थांनीं भेट कशी घेतली याचें वर्णन प्रथम केलें असून, नंतर समर्थशिष्य शिवाजी महाराजांस कोणत्या प्रकारची मदत देत असत हे खालील ओव्यांत नमूद केलें आहे:—

**कर्मा चरणीं हा न घडे योग । न घडे योगातें सिणतां अनेग ।**
**हरिजन धन्य ते समर्थ स्वांगें । लिळा विचित्र न जाणवे ॥**
**सिष्यवर्गमेळीं प्रगटले इकडे । तळमाळित बैसला पादशा तिकडे ।**
**भाविला याचेनि थोर बलाढ्य । जाला शिवाजी नाटोपे ॥**
**समर्थ योगिचा धरोनि खोप । करवी तिकडील स्वारी मतकुफ ।**
**परंतु योजितो नाना आटोप । करूनि नृपासि जिताये ॥ १६ ॥**
**कृपा जाहलीसे समर्थांची । अधिक होतसे शक्ति नृपाची ।**
**अपाय आस्था जे चिंती त्यासी । जर्थील तेथें जिरतसे ।**
**हें असो कानर्नी विसांवा घेत । सिष्य समेळीं राहिले समर्थ ।**
**बोध शोध कथिती अधिकारपरत्वें । धाडिती जाणत्या महंती करूं ॥**
**सन्निद्ध ठेविती अस्थावंता । आणवोन घेती चहुंकडील वार्ता ।**
**नेणत्या बाळासी घालऊनि कित्ता । शाहाणे करिती त्या कृपें ॥ ११९**

(दा. वि. धा. पान २१३)

चहूंकडील वार्ता आणवून तिचा उपयोग छत्रपति शिवाजी महाराजांस कशा रीतीनें होत असे, हें या उताऱ्या वरून स्पष्ट झालें आहे. समर्थप्रतापांत या च मुद्या संबंधींच्या खालील ओव्या लक्षांत ठेवण्या सारख्या आहेत:—

**समर्थें महंत विस्तारिले । कथाधारी बहुत केले ।**
**कोठें मेखळा महिमान चालविती भले । कोठें गर्वी उदासी दिसताती ॥**
**उदास गर्वी लौकिकें दिसेती । परी अंतरीं कांहीं आनारिसें ।**
**लोकांसी दिसेल तैसें । जनींजनार्दनीं वर्तावें ॥**
**देखिलें वर्तमान वार्तिकें लिहावें । समर्थ देवें सर्वांतर जाणावें ।**
**जनींजनार्दनीं महंतें मिळोन जावें । सत्कीर्तीनें भरावें भूडमंडळ ॥**

(स. प्र. पान ७६)

सर्व भरतखंडांत समर्थांनीं त्यांच्या महंतांचा जो एवढा विस्तार केला होता त्यां पैकीं कित्येक शिष्य ज्या ज्या प्रातांत राहात असत तेथील वार्ता समर्थांस कळवीत असत. या प्रमाणें निरनिराळया प्रांताची वार्ता समर्थांस मिळाल्या वर त्या त्या प्रांतांतील लोकांच्या अंतःकरणाची परीक्षा समर्थांना उत्तम प्रकारें

होत असे. अशा प्रकारें लोकांच्या अंत:करणाची परीक्षा झाल्या वर समर्थ आपल्या महंताच्या द्वारां जनतेचीं मनें आपल्या कडे आकर्षून घेत; व रामराज्य स्थापण्याचें समर्थांचें जें ध्येय त्याचा समर्थ सर्वत्र प्रसार करीत. समर्थप्रतापांतील वरील ओव्यांचा हा अभिप्राय दासविश्रामधामांत नमूद करण्यांत आलेल्या बार्बीस बळकटी आणणारा आहे. आतां छत्रपति शिवाजी महाराजांच्या सैन्यांतील शिपायांच्या ठिकाणीं आत्मविश्वास आणण्या करितां कोणत्या प्रकारची योजना समर्थांनीं केली याचा उल्लेख खालील ओव्यांत आला आहे, तो हि लक्षांत ठेवण्या सारखा आहे.

**येकदां काननीं असतां समर्थ । साधनीं वर्तती सिष्य समस्त ।**
**येऊनि शिवाजी दळभारसहित । नमोनि विध्युक्त बैसला ॥**
**तंव सरदारांनीं काहाडिल्या गोष्टी । बळें हांव बहुपरी धारितां पोटीं ।**
**युद्ध प्रसंगीं धैर्यतुटी । पडोनि मोड होतले ॥**
**माजला गलबला उत्तरा उत्तर । कांहींच न बोले नृप सत्त्वधीर ।**
**नाभिकार तेव्हां देऊनि गुरुवर । बोलिले सिध्यर्थ ऐका कसा ॥**

॥ श्लोक ॥

**लघूसी परी मूर्ति हे हाटकाची । कराची तया मारुति नेटकाची ।**
**असावी तदा तायतामाजिं दंडा । समरंगणीं पाठि दीजे उदंडीं ॥**

**थोर थोर शूरांनीं तसें चि केलें । प्रचीतीनें जयवंत जाले ।**
**यों परी नृपा सांभाळिलें । तें कथनीं वर्णिलें नव जाय ॥**

( दा. वि. धा. पान. २१५ )

युद्धप्रसंगीं शत्रूस पाठ न दाखवितां त्याच्या बरोबर लढण्याचें धैर्य सैनिकांच्या ठिकाणीं उत्पन्न करण्याच्या हेतूने, वरील युक्तीची योजना समर्थांनीं करून छत्रपति शिवाजी महाराजांच्या सैनिकांच्या ठिकाणीं आत्मविश्वास उत्पन्न केला. शिवाजी महाराज स्वराज्यस्थापने स्तव ज्या राजकीय हालचाली करीत, त्यांत समर्थ रामदास स्वामींची त्यांना मदत असे, ही गोष्ट समर्थप्रताप पान १११ वरील पुढील उल्लेखा वरून स्पष्टपणें दिसून येतें. " समर्थें आकारपूर्वक यवनास मारविलें । मग चाफळक्षेत्र उभें केलें । श्रीतुळजामाऊलीसी संस्थापिलें । जाउलीं पर्वतीं प्रतापगडीं ॥ " यांत नमूद केलेला आकारपूर्वक यवन हा शब्द कोणास उद्देशून स्वामींनीं योजिला आहे हें सूज्ञ वाचकांस सांगावयास पाहिजे असें नाहीं.

आतां पावेतों दर्शविल्या स्वरूपाच्या खटपटी करणाऱ्या समर्थांचा व त्यांच्या शिष्यांचा मुसलमानां कडून द्वेष व छळ होत असला पाहिजे हें उघड

आहे; परंतु या द्वेषास अगर छळास समर्थ अगर त्यांचे शिष्य डरत नसत. कारण समर्थांचा कैवारी हनुमान त्यांचा छळ करणाऱ्या यवनांचा परभारें समाचार घेत असे, असें समर्थप्रतापांतील खालील ओव्यांवरून दिसून येतें:—

**समर्थांच्या निस्पृहांसी यवन छळक। नागठाणी भिक्षाटणीं छळी देख।**
**समर्थ ऐकोनी वनीं पळती निःशंक। मागें हनुमान जाळिती यवनगृहें॥**

(स. प्र. पान १११)

स्वराज्य उर्फ रामराज्यस्थापनेच्या बाबतींत छत्रपति शिवाजी महाराजांना समर्थांच्या हालचाली कोणत्या प्रकारें व कितपत उपकारक होत असत, याची कल्पना आतां पावेतों आम्हीं केलेल्या विवेचना वरून वाचकांच्या चांगली लक्षांत आली असेल च; आतां स्वराज्य अथवा रामराज्यस्थापनेचें महत्वाचें अंग जी वर्णाश्रमव्यवस्था, ती मुसलमानी सत्ते खालीं विस्कळित झाली होती; तिचें पुनरुज्जीवन करण्याच्या बाबतींत समर्थांनीं कोणत्या प्रकारची कामगिरी केली, याचें दिग्दर्शन प्रस्तुत स्थळीं करणें जरूर आहे. चातुर्वर्ण्यप्रधान महाराष्ट्रीय समाजांतील ब्राह्मणवर्णाच्या लोकांचें आचरण, समर्थ जन्मास येण्या पूर्वी अत्यंत शोचनीय होतें. स्मृतींत ब्राह्मणवर्गाच्या लोकांस सांगितलेलीं विहितकर्में व व्यवसाय करणारे लोक महाराष्ट्रांत फार थोडे होते. अशा स्थितींत स्मृतींत सांगितलेल्या विधिनिषेधरूपी आज्ञांस अनुसरून आचरण व व्यवसाय करणारे ब्राह्मण महाराष्ट्रीय समाजांत प्रथम निर्माण करणें हें अत्यंत जरुरीचें व अवश्य होतें. " वर्णानां ब्राह्मणो गुरुः " या उक्तींत दर्शविल्या प्रमाणें ब्राह्मण लोकांचा दर्जा असल्याकारणानें, चातुर्वर्णीय समाजांतील इतर लोकांचे आचार सुष्ट अगर दुष्ट असणें हें बऱ्या च अंशीं ब्राह्मणवर्णाच्या लोकांच्या बऱ्यावाईट प्रकारच्या आचरणा वर अवलंबून असतें. समर्थ रामदास स्वामींनीं ही गोष्ट लक्षांत घेऊन महाराष्ट्रीय समाजांत नमुनेदार ब्राह्मण तयार केले. हे समर्थांनीं तयार केलेले ब्राह्मण दुसरे तिसरे कोणी नसून समर्थांचे शिष्य व त्यांच्या शिष्यांचे शिष्य हे होत. समर्थांनीं तयार केलेल्या ब्राह्मणांचें आचरण कशा प्रकारचें असे याची कल्पना वाचकांस करून दिली पाहिजे. स्वानुभवदिनकरकर्ते रामदासशिष्य दिनकर म्हणतातः—

**परंतु हो प्रपंची अथवा निस्पृह। तेणें वैराग्य युक्त असावें निसंदेह**
**वर्णाश्रमधर्मकर्मसमूह। प्राणांतीं ही न सांडिजे॥**

अहर्निश करावी श्रीरामभक्ति । वर्णाश्रम धर्मांचि युक्ति ।
श्रीराम उपासनेची अभिव्यक्ति । केलीच करावी निशंक ॥
वैराग्य करावें विवेकयुक्त । प्रतिज्ञा म्हणवावें श्रीराम भक्त ।
पदार्थमात्रीं कदापि आसक्त । प्राणांतीं ही न व्हावें ॥
जितुकी गोष्ट मुखें बोलावी । तितुकी क्रिया करूनि दाखवावी ।
सत्क्रिया उत्तरोत्तर चालवावी । धर्मशास्त्रविचारेंसी ॥
करावें वेदपारायण । शास्त्रचर्चा अध्यात्म निरूपण ।
कां ते श्रीरामगुणानुवाद कीर्तन । यथासांग करावें ॥
श्रीराम जयराम जयजयराम । नित्यस्मरणाचा हाचि असावा नियम।
या वाचुनी सकळ मिथ्या श्रम । वाया विण करू नये ॥

( सां. वि. वि. पान ४७ )

आज पावेतों समर्थशिष्यांची जी थोडी बहुत माहिती प्रसिद्ध झाली आहे, ती लक्षांत घेतां समर्थांचे सर्व शिष्य सदाचरणी व स्मृतिग्रंथांत सांगितलेल्या विधिनिषेधरूप आज्ञां प्रमाणें आचरण करणारे असे होते. अशा प्रकारचे नमुनेदार आचरण करणारे ब्राह्मण प्रांतोप्रांतीं पसरल्या कारणानें, ब्राह्मणवर्णीय लोकांच्या आचरणांत ताबडतोब स्थित्यंतर घडून आलें. समर्थ रामदास स्वामींनीं क्षत्रियवर्णी लोकांना त्यांचा धर्म व व्यवसाय यांची उत्तम प्रकारची ओळख करून दिली. या प्रमाणें महाराष्ट्रीय समाजाच्या अग्रस्थानीं असणारे दोन्ही वर्णांचे लोक म्हणजे ब्राह्मण व क्षत्रिय, स्मृतिधर्मास अनुसरून आचरण करणारे झाल्या कारणानें, रामराज्या प्रमाणें बाकीचे लोक हि स्मृतिविहित आचारधर्मा प्रमाणें वागूं लागले, व समाजाची घडी मुसलमानी राज्य महाराष्ट्रांत स्थापित होण्या पूर्वी जशी होती तशी जुळून आली. वर्णाश्रम-धर्माच्या बाबतींत समर्थांनीं केलेल्या कामगिरीचें थोडक्यात वर्णन गिरिधरांनीं खालील ओव्यांत केलें आहे:—

निःकाम स्वधर्मी मोक्षधर्मीं लाविले। सकाम अधर्मी युगधर्मी ठेविले ।
भावासारिखे सर्वेश्वर फळद्रूप जाले । सद्गुरु स्वामी समर्थ ॥

( स. प्र. पान ७६ )

रामराज्याचें महत्त्वाचें अंग जें वर्णाश्रमधर्मव्यवस्था, त्याच्या सुस्थितीच्या दृष्टीनें समर्थांची ही कामगिरी फार महत्त्वाची समजली पाहिजे.

आतां सुरवातीस नमूद केलेल्या तिसऱ्या मुद्याच्या चर्चे कडे आम्ही वळतों. आज पावेतों या मुद्या संबंधीं महाराष्ट्रात बरीच चर्चा झाली आहे. श्री संप्रदायाचे कागदपत्र भाग ९ वा छापण्या पूर्वी दोन तीन वर्षें अगोदर

म्हणजे शके १८३४ सालाच्या सुमारास " समर्थांचीं दोन जुनीं चरित्रें " या ग्रंथाच्या प्रस्तावनेच्या पान ४८ वर छापलेल्या पत्राच्या आधारें, समर्थ रामदास स्वामी आणि छत्रपति शिवाजी महाराज यांची प्रथमभेट शके १५९४ म्हणजे इ. स. १६७२ सालीं झाली व त्या पूर्वी परस्परांची परस्परांना कांहींएक माहिती नव्हती, असा सिद्धांत जाहीर करण्यांत आला. हा सिद्धांत ज्या पत्राच्या आधारें प्रतिपादण्यांत आला, तें पत्र कितपत प्रमाणभूत मानावयाचें ( कारण छापलेलें पत्र अस्सल नसून नक्कल आहे व त्यांतील शकाच्या आंकड्यां पैकीं नवाचा आंकडा संशयास्पद आहे ) हा प्रश्न आहे. या शिवाय हें पत्र खरें आहे असें गृहीत धरिलें, तरी त्या पत्रांतील " प्रथमभेट " या शब्दाचा अर्थ काय समजावयाचा, हा हि वादग्रस्त मुद्दा आहे. वरील पत्र ज्या वेळीं प्रसिद्ध झालें त्या च वेळीं, कै. वि. का. राजवाडे यांनीं वर उल्लेखि- लेल्या पत्रांतील प्रथमभेट या शब्दाचा पहिली च भेट असा अर्थ न समजतां, विशिष्ट कालविभागांतील अनेक भेटींच्या प्रसगां पैकीं प्रथमभेट असा अर्थ समजणें युक्त आहे, असा या वादग्रस्त मुद्या विषयी पत्र द्वारें जाहीर खुलासा केला होता. या प्रमाणें त्या वेळेपुरता हा वाद शमल्या नंतर कै. राजवाडे यांचें लक्ष या मुद्या संबंधींच्या कागदपत्रांच्या संशोधना कडे गेलें. खुद्द चाफळास रा. बापुराव उपाध्ये यांच्या येथील जुन्या कागदपत्रांचा गळाठा तपाशीत असतां त्यांना सांपडलेल्या एका वाकेनिशी स्मरणटिपणा आधारें त्यांनीं या प्रश्नाची पुनर्चर्चा " श्रीसमर्थ रामदास स्वामी यांनीं श्रीशिवछत्रपतींस अनुग्रह दिल्याचा नक्की काळ " या मथळ्या खालीं " सांप्रदायिक विविध विषय " या ग्रंथांत प्रसिद्ध झालेल्या एका लेखांत केली. या लेखांत समर्थांनीं शिवाजी महाराजांस अनुग्रह दिल्याचा नक्की काळ शके १५७१ हा असल्याचें ठरवून, समर्थ रामदास स्वामी आणि छत्रपति शिवाजी महाराज यांचें लक्ष परस्परांच्या हालचालींच्या योगानें परस्परां कडे कधीं वेधलें गेलें असलें पाहिजे, या विषयींचीं कांहीं अनुमानें लेखाच्या शेवटीं दिलीं आहेत. कै० राजवाडे यांनीं प्रगट केलेलीं अनुमानें किती यथार्थ आहेत, हें आह्मी जें विवेचन करणार आहों त्या वरून सिद्ध होणार आहे. समर्थ रामदास स्वामी आणि छत्रपति शिवाजी महाराज यांच्या अन्योन्यसंबंधाच्या बाबतींत जी चर्चा आह्मी करणार आहों, ती बरोबर लक्षांत येण्या करितां रामदास स्वामी गोदातटाक सोडून कृष्णातटाकीं कधीं आले, त्यांनीं चाफळास श्रीरामाची स्थापना कधीं केली व त्या दरम्यानच्या

काळांत त्यांनीं कोणत्या हालचाली केल्या या गोष्टी कालानुक्रमें वाचकांच्या नजरेस आणणें जरूर आहे. राजवाड्यांच्या वरील लेखांत हा तक्ता दिला आहे. प्रस्तुत ज्या मुद्याची चर्चा आम्ही करीत आहों, त्या मुद्याच्या दृष्टीनें त्यांतील महत्वाचीं तेवढीं च कलमें आम्ही येथें देतों:—

१२ शके मजकुरी १५५४ आंगीरानाम संवत्सर शिवनामा उत्पन्न झाला. कृष्णातीरास जावें. पृथ्वीप्रदक्षिणा करून जातों म्हणोन गेले. फाल्गुन मासीं शुद्ध पक्षीं.

१३ बारावर्षें पर्यंत काशी हिमालयादि करून श्वेतबंदि जाऊन बीभीषणाची भेटी घेऊन प्रदक्षिणेचे समयीं अनेक स्थळीं अनेक प्रकारची लीला केली त्याचा विस्तार उद्धव गोसावी लिहिजेलें पंचवटीस श्रीचें दर्शन करून श्रीकृष्णातीरीं पंधराचे सासष्टींत आलें............

१४ शके १५६६ तारणनाम संवत्सरी महाबळेश्वरी श्री मारुतीची स्थापना करून, वाईस मारुतीची स्थापना करून माहुली संगमी व जरंड्यावर राहाणें तेथें जयराम स्वामी, तुकाराम, रगनाथ स्वामी, रघुनाथ स्वामी, आनंदमूर्ती, धरणीधर देव, केशव स्वामी, वामन स्वामी, इत्यादिकांचीं दर्शनें जालीं. त्या लीलेचा विस्तार अलाहिदा बाजीपत्रीं लिहिलें असे.........

## पुरवणी २

१५ श्रीकृष्णातीरीं शिष्यसंप्रदाय शहापूरकर इत्यादि मंडळी, आका वेणूबाई, आंबाजी चाफळी नरसो मल्लनाथ, भानजी गोसावी आदिकरून सांप्रदायी जाले. शिरगांवीं आंबाजीचे मातुश्रीस व बधूस तेथें ठेवून टाकळीहून उछवास आणविलें. शके १५६७ पार्थीव संवत्सरी श्रीच्या नवमीच्या उत्साहास प्रारंभ केला त्या उत्साहांत आंबाजीचें नांव कल्याण म्हणोन फांदी तोडल्यामुळें पाडिलें. त्याच सालीं वीहीरींत भीमाजी बाबास अनुग्रह जाला. हें चारित्र मुसुर मुक्कामीं जालें. तपशील अलाहिदा लिहिला आहे.

१६ शके १५६९ यकोण हातरीत आंगापुरचे डोहांतून मूर्त आणली. शके ( श्रीसांप्रदायाचे कागदपत्र प्रस्तावना पान ११४ पाहा. ) १५७० सर्वधारीनाम सवत्सरी उत्साहास प्रारंभ चाफळी जाहला. अकरा मारुतीची स्थापना केली. शके १५६७ पासुन १५७२ पर्यंत अकरा मुर्तीची स्थापना कारणपरत्वें जाल्या त्या वेणुबाईनीं चरित्र वर्णिलें डोळेगावचे मारुती सुध्धा.

१८ शिवाजी माहाराज यास आनुग्रह शके १५७१ शिंगणवाडीचे

बागेंत वैशाख शुध्द नवमी गुरुवारी जाला वरकड शिव छत्रपती प्रकरण अलाहिदा लिहीलें आहे.

( श्री. दा. वि. वि. पान ११९ )

वरील कलमां पैकी पंधराव्या कलमांत जी बाब नमूद केली आहे, तीस समर्थशिष्य, तंजावरकर भीमस्वामी यांनीं समर्थांचें जें चरित्र लिहिलें आहे त्या वरून बळकटी येते:—

पुढें नाना भक्त मिळाले अपार।
महोछाव थोर थोर होती।
शाहापुर स्वामीचें मुख्य अधिष्टान।
मोक्षाचें भूवन भूमंडळी ॥ ४२ ॥

( श्री. दो. जुनी चरित्रे पा. १८३ )

या उल्लेखां वरून चाफळास रामदासांचें वास्तव्य होण्या पूर्वी स्वामींचें वास्तव्य मुख्यत्वेंकरून शाहापुरीं होतें. शाहापुराहून स्वामी मसुरास गेले व तेथें श्रीरामाचा उत्सव करण्याचा सांप्रदाय सुरू केला. या उत्सवास प्रारंभ शके १५६७ म्हणजे इ. स. १६४५ सालात झाला. त्या वेळीं, आज पावेतों प्रचलित असलेली शिवाजी महाराजांची जन्मतिथी ग्राह्य धरिली, तर त्यांचें वय अठरा वर्षांचें होतें; हल्लीं त्यांची जन्मतिथी जी पुढें आली आहे ती ग्राह्य धरली, तर त्याचें वय त्या वेळीं पंधरा वर्षांचें होतें. आम्ही आतां जो पुरावा वाचकां पुढें मांडणार आहोंत त्या वरून समर्थ रामदास स्वामी व छत्रपति शिवाजी महाराज यांना परस्परांच्या हालचालींची माहिती शके १५६७ साला पूर्वी असून, त्या उभयताची भेट त्या सालांत झाली असें दिसून येणार आहे. हा जो पुरावा वाचकां पुढें आम्ही मांडणार आहों, तो म्हटला म्हणजे समर्थ रामदास स्वामीचे दासविश्रामधाम या नांवाचें जें प्रचंड चरित्र प्रसिद्ध झालें आहे, त्यातील वर्णिलेला त्या उभयतांच्या भेटीचा प्रसग होय. हा पुरावा कितपत ग्राह्य समजावयाचा या विषयीं, श्रीरामदास आणि शिवाजी महाराज यांच्या अन्योन्यसंबंधा विषयीं ज्याचीं निराळया प्रकारचीं मतें आहेत, त्याच्या कडून शंका येणें संभवनीय आहे; या स्तव या पुराव्यास कितपत महत्त्व द्यावयाचें व तो कितपत ग्राह्य धरावयाचा हें ठरविण्यास वाचकांस मदत व्हावी, म्हणून दासविश्रामधाम या ग्रंथा विषयीं व त्याच्या कर्त्या विषयीं कांहीं बाबी आम्ही नमूद करितों. दासविश्रामधाम या ग्रंथाच्या कर्त्यांचा समर्थ सांप्रदायांत कोणत्या प्रकारचा अधिकार समजत, याची नीट कल्पना या खंडाच्या चवथ्या खंडास

जोडलेल्या प्रस्तावनेंत माझे मित्र रा. शंकर श्रीकृष्ण देव यांनीं दर्शविलेल्या खालील अभिप्रायावरून होण्या सारखी आहे:—

"त्या कल्याणांचा परिपाठ असा असे कीं, शिष्य मंडळी भोंवताली जमली आणि दुसरें कांहीं काम नसलें म्हणजे त्यांनीं समर्थांच्या लीला प्रेमभरें सांगाव्या. कल्याणांचे मुख्य शिष्य दोन. (१) आपचंद मठपति शिवराम स्वामी, "वैराग्याचा राजा रामदास स्वामी माझा" या सुंदर पदांचें कर्ते व (२) तडवळे मठपति जगन्नाथ महाराज "धाव रे रामदासा गुरुवर्या सर्वेशा" हा धावा ज्यांनीं केला ते. कल्याणाच्या मुखानें या दोघांनीं श्रीसमर्थचरित्र ऐकावें व अंतरीं सांठवावें. त्या दोघां पासून तें पावन चरित्र रामचंद्रांना ऐकावयास मिळावें. रामचंद्र हे शिवरामाचे शिष्य होत. त्यांचें बालपण शिवरामांच्या व तरुणपण जगन्नाथ यांच्या संगतींत गेलें. प्रस्तुतच्या दासविश्रामधाम या प्रचंड ग्रंथाचे कर्ते हे रामचंद्राचे शिष्य होत. अशा परंपरेंतील हा प्रासादिक ग्रन्थ आहे." या अभिप्राया वरून या ग्रन्थाचे कर्ते आत्माराम स्वामी, यांना समर्थचरित्रा विषयीं विश्वसनीय माहिती गुरुपरंपरेच्या नात्यानें मिळाली असली पाहिजे हें उघड आहे. या शिवाय आत्माराम स्वामींनीं दासविश्रामधाम ग्रंथाची ज्या काळीं रचना केली, त्या काळीं समर्थांचीं त्यांच्या अनेक शिष्यांनीं जीं चरित्रें लिहिलीं व जीं आज उपलब्ध नाहींत, तीं त्यांच्या अवलोकनांत असलीं पाहिजे, असें अनुमान करणें चुकीचें होणार नाहीं. या गोष्टी लक्षांत घेतां दासविश्रामधामांत समर्थ रामदास स्वामी व छत्रपति शिवाजी महाराज यांच्या भेटीचा जो प्रसंग वर्णिला आहे व जो आम्ही आतां च वाचकां पुढें मांडणार आहों, तो सकृद्दर्शनी विश्वसनीय मानिल्या वांचून गत्यंतर नाहीं. तथापि या उल्लेखास इतकें प्राधान्य देणें वाजवी नाहीं अशी कुशंका कोणीं काढिल्यास, दासविश्रामधामांतील वर्णिलेला भेटीचा प्रसंग संभवनीय आहे व या प्रसंगा पूर्वी उभयतांस परस्परांच्या महाराष्ट्रोन्नती प्रीत्यर्थ चाललेल्या हालचालींची व परस्परांच्या ध्येयाची माहिती होती, असें बळकट अनुमान ज्या पुराव्या वरून निष्पन्न होतें, असा दुसरा पुरावा आम्ही येथें नमूद करणार आहों. हा पुरावा म्हटला म्हणजे मराठ्यांच्या इतिहासाचीं साधनें खंड पंधरावा यांतील जगदळे घराण्याच्या कागदपत्रांत आढळणाऱ्या कांहीं महत्त्वाच्या बाबींचा व व्यक्तीचा नामनिर्देश हा होय. दासविश्रामधामां-

संबंधीं इतकी प्रस्तावना करून, आम्ही आतां दासविश्रामधामांतील समर्थ रामदास व शिवाजी महाराज यांच्या भेटीच्या प्रसंगाचें वर्णन जसेंच्या तसें येथें देतों.

हें वर्णन देण्या पूर्वी भेटीच्या प्रसंगाचें पूर्वानुसंधान लक्षांत येण्या करितां दासविश्रामधामांत नमूद केलेली पूर्वीची कांहीं माहिती येथें देतों. दासविश्रामधामांत पान २४० वर समर्थ शाहापूर येथें गेले असतां, तेथें घडलेली हकीकत दिली आहे. शाहापूर येथें श्री हनुमंताची स्थापना समर्थांनीं केल्या नंतर त्या ठिकाणीं त्यांनीं मोठा उत्सव केला, त्याचें वर्णन आत्माराम स्वामींनीं केलें असून त्या नंतर ते म्हणतातः—

निवाले निर्वावती सद्भक्त । रूद्र बावादि राहिले तेथ ।
सहासिष्य स्वामींनीं जावें पुढें ।

या ओवींत रुद्र बावा या व्यक्तीचें नांव नमूद करण्यांत आलें आहे, तें लक्षांत ठेवण्या सारखें आहे. शाहापुराहून समर्थ रामदास पुढें कोठें गेले याचें दिग्दर्शन दासविश्रामधामकारांनी खालील ओव्यांत केलें आहेः—

तव अर्पूनि तरावया तनमनधन । मसुरकरांनीं आले शरण ।
वळखोनी तयाचें अंतःकरण । पातले मिरवत त्याच्या स्थळा ॥
भाव तयाचा देखोनी निर्मळा । मठ निर्मविला दीन दयाळें ।
करू विध्युक्त पर्वकाळ । मारुतिराया स्थापिलें ॥

मसुरास या प्रमाणे मारुतीची व मठाची स्थापना केल्या नंतर रामनवमीचा उत्सव करावा असें समर्थांच्या मनांत आलें. स्वामींनीं उत्सवांत देवाची मिरवणूक काढण्या करितां रथ तयार करविला; उत्सवप्रसंगीं देवाच्या मूर्ति रथांत बसवून ज्या मार्गानें रथ न्यावयाचा, त्या मार्गांत झाडांचा अडथळा येईल असें समर्थांस दिसून आलें; सबब विजापुरीं बादशहाकडे जाऊन झाडें तोडण्याची परवानगी त्यांनीं कशी मिळविली, याचें वर्णन दासविश्रामधामकारानें केलें आहे, तें प्रथम देऊन त्या वरून व तत्कालीन दुसऱ्या कागदपत्रां वरून समर्थ–शिवाजीसंबधाविषयक सुचणारीं कांहीं अनुमानें आम्ही येथें नमूद करितों:—

स्वयें पांचाळा सांगत समर्थ । निर्माण करविला सुंदर रथ ।
तंव गांवकरी ते सर्व हि भक्त । नमोनि केली विज्ञापना ॥
रथ चालवावा जया मार्गी । वन अंबेचे लागलें लगीं ।
व्हावी तोडवाया परवानगी । विजापुरी असे पात्छाची ॥

धाडूं कीं जाऊं परवानगिला। उत्छाव नेम तो समिप उरला।
समुदाव यात्रेचा भरत चालिला। वार्ता फांकोनि चहुंकडे॥
वदलें स्वामींनीं कर्ता राघव। शुद्ध राजा हो एक सद्भाव।
फांवेल तितुकें करित जावें। समजोनि राहिले विलासत॥
सहज उठोनि श्रीमोक्षपाणी। पादशां असतां एकांत सदनीं।
उषःकाळीं पुढें जाउनि। ठाकतां घाबिरे नवल म्हणे॥
सर्वे चि मानिला संतोष मनें। धन्य वळींचें घडलें दर्शन।
मग नमोनि पुसतां नामाभिधान। केलें निर्वचन त्यांत चि॥
तो हात जोडितां तैं दिनोद्धार। या देह नांव वदले दास फकीर।
पादशा म्हणे जी आहां साचार। जिंदा फकीर गैबीशा॥
बैसऊनि आदरें मानीत संभ्रम। वदे जी मेहरसे किया करम।
तब जुः फर्मानाहो आवेगा काम। वदले भक्तोत्तम तैं हांसत॥
ऐकोनि यापरी सुबोध वचन। पुसे तिकडील वर्तमान।
खुदाई माजील मी येक दीन। काय बुद्धिवाद सांगतां।
ऐसियापरी बोलोनि समर्थें। मागूनि कळविलें मसुरवृत्तांत।
वन तोडल्यानें चालती रथ। ऐकोनि वदे तो अवश्य॥
कृपा करोनि पाच दिन। येथें राहावें जी देत दर्शन।
हो हो तैसें चि काम संपादणें। केलें पाहिजे झडकरी॥ ७५॥
जे चालणार काम पडलें तितुकें। देऊनि तयांला ताकीद दस्तक।
धाडितां जोडी करूनि पाइक। ग्रामाबाहेरी पातलें॥
पुढें ठाकले असती निस्पृही। त्या सांगती पोहचा लवलाही।
कोडणूर संगमा जाऊनि आम्ही। मागून येतों हळु हळु॥ ८७॥

(दा. वि. धा. पान २०४)

वरील उताऱ्यांत दासविश्रामधामकारांनीं दिलेली हकीकत निवळ काल्पनिक आहे, असा कित्येकांचा आक्षेप येण्याचा संभव आहे. या हकीकतीस आधारभूत असलेले तत्कालीन लेख उपलब्ध न झाल्या मुळें, सकृद्दर्शनीं हा आक्षेप बरोबर दिसतो; परंतु अलीकडे त्या काळच्या प्रसिद्ध झालेल्या कांहीं लेखांच्या आधारें वरील उताऱ्यांतील हकीकत खरोखर घडली असली पाहिजे, हें मान्य करण्या कडे प्रवृत्ति होते. समर्थ रामदास स्वामी शके १५६७ सालच्या सुमारास शहापूर, मसूर या ठिकाणीं राहावयास आले. त्या सुमारास व त्या नंतर विजापूरच्या मसनदी वर महंमद अदिलशाहा व त्याच्या पश्चात् अल्ली अदिलशहा हे विराजमान झाले होते. या बादशहांच्या कारकीर्दीत मुरार

जगदेव, शहाजी राजे भोंसले, बाजी घोरपडे इत्यादि महाराष्ट्रीय, विजापूरच्या बादशहाच्या दरबारीं वजनदार सरदार होते. हे हिंदूंच्या देवता व देवस्थानें ह्या विषयीं अभिमान बाळगीत व यांच्या प्रीत्यर्थ थोड्या फार इनाम जमिनी विजापूरच्या बादशहा कडून मिळवून देत असत. त्या काळचे ब्रह्मनाळचे आनंमूर्ति, चिंचवडचे मोरयादेव यांना विजापूरच्या बादशहा कडून इनाम जमिनी मिळाल्या बद्दलच्या सनदा अलिकडे उपलब्ध झाल्या आहेत. चिंचवडच्या देवस्थानास विजापूरच्या बादशहा कडून मिळालेल्या सनदेंत शहाजी राजे यांचा मोठ्या गौरवपूर्वक उल्लेख केलेला आहे. म. इ. सा. खंड ८ मध्यें विजापूरच्या बादशहाच्या दरबारीं असलेल्या यानतराव या हिंदु अधिकाऱ्यानें, ब्राह्मणास इनाम जमिनी दिल्याबद्दलचीं पत्रें प्रसिद्ध झालीं आहेत. सां. वि. वि. खंड ३ पान १० मध्यें काशीभट बीन अनंतभट या कऱ्हाड येथील ब्राह्मणास विजापूरच्या बादशहा कडून मिळालेल्या जमिनी संबंधाचीं तीन पत्रें छापिलीं आहेत. या पत्रांत शहाजी राजे यांच्या कारकीर्दी पासून जमीन इनाम चालत आली असल्याचा उल्लेख आहे. सां. प. व्य. भाग ९ लेखांक ५२ मध्यें चाफळ येथील श्रीरामास उंब्रज व कोरटी या गांवीं दोन चावर जमीन व बाजी घोरपडे यांनीं चरेगांव व माजगांव या गांवीं एक चावर व पांच बिघे जमीन इनाम दिल्याचा उल्लेख आहे. या सर्व पत्रांचा साकल्यानें विचार केला असतां, विजापूरच्या दरबारीं असलेले महाराष्ट्रीय सरदार आपलें वजन खर्च करून हिंदूंच्या देवता व ब्राह्मण यांना इनाम जमिनी मिळवून देऊन, त्यांचा परामर्ष घेत असत असें दिसतें. वरील उताऱ्यांत झाडें तोडण्याची परवानगी मिळविण्या करितां समर्थ रामदास स्वामी विजापुरास गेल्याचा उल्लेख आहे.

**कुग्रामे अथवा नगरे । पाहावीं घरांचीं घरें ।**
**भिक्षामिसें लहान थोरें । परिक्षूनि सोडावीं ॥**

(दा. १५।६।२४)

अशा प्रकारचा उपदेश करणारे रामदास विजापुरास गेल्या वर स्वधर्माविषयीं अभिमान बाळगणाऱ्या व हिंदु देवतांचा व देवस्थानांचा परामर्ष घेणाऱ्या यानतराव, मुरार जगदेव, शहाजी राजे, बाजी घोरपडे इत्यादि वजनदार महाराष्ट्रीय सरदारांस भेटल्या विना राहिले असतील, अशी कल्पना करवत नाहीं. समर्थ विजापुरास गेल्या वर वरील सरदारांच्या भेटी घेऊन, त्यांच्या द्वारें त्यांनीं बादशहाची गांठ घेतली असली पाहिजे व झाडें तोडण्याची

परवानगी बादशहा कडून मिळविली असली पाहिजे असें स्वाभाविक अनुमान निघतें. समर्थांच्या व बादशहाच्या गांठीच्या प्रसंगीं, त्यांची ती भव्य मूर्ति व ऊर्दू[1] भाषे वरील, त्यांच्या बोलण्या वरून बादशहास दिसून आलेलें, प्रभुत्व याच्या योगानें बादशहाच्या मना वर त्यांची छाप बसून, त्याने झाडें तोडण्याची परवानगी समर्थांस सहज च दिली. समर्थांचा, झाडें तोडण्याची परवानगी मिळविण्याच्या बाबतींत, विजापूर दरबाराशीं आलेला संबंध, तसा च पुढें चालू राहिल्याचें दिसतें. त्यांनीं स्थापन केलेल्या चाफळच्या देवस्थानास विजापूरच्या बादशहा कडून जमिनी इनाम मिळाल्या बद्दलचा, पूर्वी आम्हीं उल्लेख केला च आहे[2]. या इनाम जमिनीं पैकीं उंब्रज व कोरटी येथील जमीन द्यानतराव यांनीं व माजगांव व चरेगांव येथील जमीन बाजी घोरपडे यांच्या मार्फतीनें, श्रींस इनाम मिळाल्याचा उल्लेख लेखांक ५२ मध्ये आहे. या गांवां खेरीज करजवणें, शिंगणवाडी, मसूर, शिरगांव, शहापूर या गांवच्या जमिनी, शहाजी राजे यांच्या कडून इनाम मिळाल्या असाव्या, असें अनुमान काढण्यास बरी च वाव आहे. समर्थांच्या शिष्यमंडळीं पैकीं अक्काबाई या कऱ्हाडच्या रुद्राजीपंत[3] देशपांड्यांच्या कन्या होत. ( हनुमंत स्वामीची बखर पान ७२ पाहा ) वर नमूद केलेल्या द्यानत-रावांचें मूळ नांव काशीपत असून, ते रुद्राजी चंदो, कऱ्हाडचे देशपांडे यांच्या घराण्या पैकीं होते. मसुरकर जगदळ्यांचीं मसूर व कऱ्हाड येथील देशमुखी वतनें त्यांच्या पासून हिरावून घेण्याच्या, शहाजी राजे यांनीं त्या काळीं चाल-विलेल्या खटपटीत प्रमुख भाग रुद्राजी चंदो घेत असे, हें जगदळे घराण्याच्या लेखां पैकीं जे उतारे आम्ही पुढें देणार आहोंत, त्यां वरून दिसून येईल. समर्थ शहापूर व मसूर येथें वास्तव्य करण्यास आल्या वर जी मंडळी

---

१ समर्थांचें उर्दू भाषे वर प्रभुत्व कोणत्या प्रकारचें होतें हें रामदासांची कविता प्रथम पान ४०१ वर

" सुनावे गैब क्यां बांता । गैबीं मर्द उसे कहो । बडा सो पी सो वली । खुदाई वाट काहवी ॥ इ०" या प्रकरणावरून दिसून येतें.

२ श्रीसांप्रदायाचे कागदपत्र भाग ९ लेखांक १७।१८।२१।२२।२६।२८ आणि ९७ पाहा.

३ सा. वि. वि. खंड ३ ( पान १० वर ) मध्यें छत्रपति शिवाजी महाराजांनीं केलेला निवाडा छापिला आहे. त्यांत परगणे कऱ्हाडचे देसक या सदराखालीं रुद्राजी चंदो देस कुलकर्णी कऱ्हाड याची सही आहे. शके १५९७,

त्यांची शिष्य बनली, त्यांत रुद्राजी हे एक होते. समर्थांचें शिष्यत्व पत्करल्या वर त्यांनीं स्थापन केलेल्या देवस्थानास इनाम जमिनी बादशहा कडून मिळवून देण्याची खटपट, रुद्राजी चंदोनें त्याच्या घराण्यांतील यानतराव ऊर्फ काशीपंत व शहाजी राजे यांच्या मार्फतीनें केली असली पाहिजे, असें अनुमान काढणें अयुक्तिक होणार नाहीं. येथ पावेतों केलेल्या विवेचना वरून विजापूर दरबाराशीं समर्थांचा संबंध कशा रीतीनें जुळून आला असला पाहिजे, हें आम्हीं स्पष्ट करून दाखविलें आहे. हा संबंध लक्षांत घेतां, त्या काळीं शहाजी राजे व छत्रपति शिवाजी महाराज यांनीं त्या प्रदेशांत चालविलेल्या खटपटीची वार्ता हि, समर्थां सारख्या चौकस पुरुषाच्या कानां वर गेली नव्हती, हें संभवनीय दिसत नाहीं. या च प्रमाणें रुद्राजी चंदो सारख्या समर्थशिष्या कडून, समर्थ हे कोणत्या ध्येयाचे भोक्ते होते ही वार्ता शहाजी राजे व शिवाजी महाराज यांच्या कानीं गेली नाहीं व ती वार्ता त्यांच्या कानीं जाऊन हि छत्रपति शिवाजी महाराजांस समर्थांची भेट घेण्याची इच्छा झाली नाहीं, असें मानणें प्रशस्त दिसत नाहीं. साधुसंतांचीं दर्शनें घ्यावयाचीं, त्यांचीं कथाकीर्तनें ऐकावयाचीं असा छत्रपति शिवाजी महाराजांचा स्वभाव असल्याचें सर्वश्रुत आहे. या स्वभावास अनुसरून समर्थ रामदासांच्या ध्येया विषयींची वार्ता त्यांच्या काना वर गेल्या नंतर, दासविश्राम-धामकर्त्यांनीं पुढील उताऱ्यांत वर्णिल्या प्रमाणें समर्थांच्या भेटी विषयींची शिवाजी महाराजांस तळमळ लागली असली पाहिजे, हें ग्राह्य करण्याची वाचकांची प्रवृत्ति झाल्या वांचून राहाणार नाहीं.

**हें असो ऐका पुढील कथन । उत्छाव मांडला घमंड ।**
**स्वारी माणसा धाडिता त्वरित । अंबाजी माताबंधुसहित ।**
**येऊनि पोंचला बजाजीपंत । जो सद्गुरुनाथा प्रिय शिष्य ।**
**उपदेश जाहला त्या उभयतांसी । कांहीं दिन ठेविलें तेथेंचि त्यांसी ।**
**सीग चढत चालला परमार्थासी । मनें मन मिळत चाललें ॥**
**परमभक्त इकडे शिव नृपाळ । गुरुरायाचीं आठऊनि पाउलें ।**
**आहोरात्र करितसे तळमळ । न वाटे गोड अन्नवसन ॥**
**गागापंडितादि पुरुष विकल्पी । राजास वोढूं पाहती संकल्पी ।**
**मार्गे इत्यादि पापरूपी । निंदोन बोलती भलतेंचि ॥**
**परंतु गुरुपदीं जडली वृत्ती । स्तब्धाचि पूर्णता वरितो शांती ।**
**न करीच अपेक्षा भोगादि संपत्ति । राजभार तुच्छ पैं केला ॥**

निजोनि एकदां एकांत सदनीं । गुरुवर्यासी आठवोनि ध्यानीं ।
तळमळे अश्रु लोटले नयनीं । विकळ व्याकूळ पावला ॥

या प्रमाणें समर्थांच्या भेटी विषयीं शिवाजी महाराजांस लागलेल्या तळमळीचें वर्णन करून बादशहा कडून समर्थांनीं झाडें तोडण्याची परवानगी मिळविल्या वर ते मसुरास परत आले व अंबाजीनें ( कल्याण यांचें पूर्वीचें नांव ) झाड, कसें तोडिलें, याचें वर्णन आत्माराम स्वामींनीं केलें आहे. हा कथा भाग वर्णिल्या वर श्रीरामाच्या उत्सव प्रसंगीं समर्थांच्या व शिवाजी महाराजाच्या भेटीचे वर्णन खालील ओव्यांत आत्माराम स्वामींनीं केलें आहे:—

तंव सन्मुखी ठाकले श्री मोक्षपाणी । दचकोनि कांपत ठाकला उठोनी ।
तितुक्यात स्वरूपी बहु बुद्धि कथुनी । अंतर्धान पावले ॥
कोण कोण पुरुष कवण्यास्थानीं । कसें राहटती का नाणील ध्यानीं ।
राजकारण तर्जविजा मनीं । विवरतां बैसेल बंद ॥
सिक्षा दिक्षाचें काम हें पूर्ण । बहुतां करावे लागते पाळण ।
तरि असावें बहु सावधान । इहपर कीर्ती संपादिजे ॥
ऐसे बोलोनि जातां दयाळ । मग अत्यंत ची जाला विकळ ।
तितिक्यांत स्वप्नीं सादृश्य जाले । समर्थांनीं अश्वासिलें ॥
बोलोन गेले ये महसुरासी । उठोनि विस्मयो मानी मानसीं ।
करूनि स्वारी अतित्वरेसीं । सद्गुरु जवळी पातला ॥
तेथें उपचारा काय उणें । बहुतेकांचे होतसे पोषण ।
तेथें तगादा नाहीं मागणें । समसमान राव रंक ॥
नवमीस जालें देवजन्मचरित्र । रात्रीं दशमीच्या संपवूनि ललित ।
निरोप देऊनि वाह्मरातें । प्रेमारती गाइली ॥
वंदोनि आज्ञा गेला नृपवर । बहु गांवकरी संतोषले ।
अंबाजीचे बंधुमाउली गुरुआज्ञें राहिले । तये स्थळीं ॥
नित्य नेम पूजा सर्वकाळीं । चालाया विलें लाविले ।
दत्त रुद्राजी अंबाजी सहित । आणीक हि शिष्य समवेत ।
काननामाजीं बसले समर्थ । पावन करीत जडमूढ ॥

( दा. वि. धा. पान २०६।२०७ )

या ओव्या ज्या भागांत आल्या आहेत त्याचा शेवट खालीलप्रमाणें आहे.

इतिश्री रामकृपा । तारक मार्ग सुसोपा । कीर्तनीं राववास धांवा करणें । भवतम व्याख्या मसुरास येणें । सांप्रदायी जाले । पाच्छास भेटणें । मठी मारुती स्थापून उत्छाव करणें । अंबाजी कल्याण नाम पावणें । नृपास अश्वासन देणें । वर्ग सत्तावीस ॥ २७ ॥

वरील उताऱ्यांत समर्थ रामदास स्वामींनीं शके १५६७ सालीं जो

रामनवमीचा उत्सव केला, त्या प्रसंगीं शिवाजी महाराज हजर होते ही महत्त्वाची बाब नमूद आहे. उत्सव होण्या पूर्वी शिवाजी महाराजांस समर्थांच्या भेटीची तळमळ लागल्याचा व स्वप्नांत मसुरास येण्या विषयीं त्यांना समर्थांनीं आज्ञा केल्याचा उल्लेख या उताऱ्यांत आहे. समर्थांच्या दत्तु, रुद्राजी, अंबाजी या शिष्यांचीं नांवें या उताऱ्यांत नमूद करण्यात आलीं आहेत. तीं हि लक्षांत ठेवण्या सारखीं आहेत. त्यां पैकीं रुद्राजीचें नांव पुढें जें आम्ही विवेचन करणार आहों, त्या दृष्टीनें महत्त्वाचें आहे. समर्थ रामदास स्वामी आणि शिवाजी महाराज यांची भेट वर नमूद केल्या प्रमाणें शके १५६७ म्हणजे इ. स. १६४५ सालांत होण्या पूर्वी, परस्पराच्या हालचालींची माहिती परस्परांस झाली असली पाहिजे, हें वरील उताऱ्या वरून दिसून येतें. समर्थ रामदास स्वामींच्या चरित्राची व हालचालींची माहिती, शिवाजी महाराजांस वरील भेटी पूर्वी झाल्या विना, त्यांची भेट घेण्याची तळमळ त्यास लागणें संभवत नाहीं. दासविश्रामधामांत वर्णिलेल्या समर्थशिवाजीभेटीच्या प्रसंगा संबंधीं या पुढें आम्हीं नमूद केलेला इतर पुरावा व त्या विषयीं आम्हीं केलेली पुढील चर्चा लक्षांत घेतां, शिवाजी महाराजांच्या पूर्ववयांत च त्यांची व शिवाजी महाराजांची भेट झाली होती, ही बाब सिद्धांतवत् मानण्याच्या अवस्थेप्रत पूर्वी पेक्षां किती तरी पटीनें अधिक समीप आली आहे, याचें आम्ही दिग्दर्शन करितों. हें करण्या पूर्वी दासविश्रामधाम ग्रंथाच्या विश्वसनीयते विषयीं कांहीं महत्त्वाच्या गोष्टी लक्षांत बाळगणें जरूर आहे. दासविश्रामधामाचे कर्ते आत्माराम स्वामी हे रामदासी संप्रदाया पैकीं १२५ वर्षां पूर्वी होऊन गेलेले एक विद्वान् मठाधिपति असून, त्यांनीं दासविश्रामधाम हा ग्रंथ अत्यंत परिश्रम घेऊन लिहिलेला आहे. समर्थां संबंधीं या ग्रंथात ठोकळ व बारीक सारीक माहिती त्यांनीं विस्तृत रीतीनें दिलेली आहे. प्रत्यक्ष समर्थांचें समग्र चरित्र समर्थांच्या ज्या प्रमुख शिष्यांनीं पाहिले होतें व जे त्यांनीं आपल्या शिष्यांस निवेदन केलें होतें, अशा शिष्यां पासून मिळालेली माहिती आत्माराम स्वामींनीं या ग्रथांत नमूद केलेली आहे. समर्थशिष्य अंबाजी यांना कल्याण हें नांव मसुरास वरील उताऱ्यात नमू केलेल्या रामजन्मोत्सवप्रसगीं समर्थां कडून मिळाले होतें. या च प्रसंगीं शिवाजी महाराजां सारखा थोर पुरुष हजर असणें ही गोष्ट घडली असल्या कारणानें, ती कल्याणांच्या ठळकपणें लक्षांत राहून, त्यांनीं ती त्याचे शिष्य आपचंद मठाधिपति

शिवराम व तडवळे मठाधिपति जगन्नाथ यांना खात्रीनें सांगितली असली पाहिजे या विषयीं संदेह नाहीं. कल्याणांच्या वरील शिष्यानीं ही गोष्ट अत्यंत महत्त्वाची म्हणून त्याचे शिष्य शिवराम, शिवरामांनीं त्याचे शिष्य रामचंद्र व रामचद्रानीं त्याचे शिष्य दासविश्रामधामकर्ते आत्माराम, याना सागितली असली पाहिजे व अशा रीतीनें हा भेटीचा महत्त्वाचा प्रसंग दासविश्रामधामग्रथात नमूद केला गेला असला पाहिजे, असें सहाजिक अनुमान निघतें.

आम्हीं दर्शविलेली ही परंपरा लक्षांत घेतली म्हणजे पुराव्याच्या दृष्टीनें या हकीकतींत काणत्या हि प्रकारचें वैगुण्य आहे, असें म्हणता येत नाहीं; व अर्थात् च ही हकीगत सकृद्दर्शनीं सत्य व विश्वसनीय मानणे जरूर आहे. दासविश्रामधामातील वरील हकीकत सत्य व विश्वसनीय नाहीं असा पक्ष कोणीं पुढें आणला, तर तो सिद्ध करण्याचा बोजा त्याचे वर पडला पाहिजे. असें जरी आहे तथापि वरील प्रकरचा पक्ष पुढें माडून त्याचें समर्थन करण्यास काणी पुढें सरसावण्या पूर्वी, दासविश्रामधामातील वरील भेटीच्या प्रसंगाच्या हकीकतीच्या सत्यतेस बळकटी आणणारा दुसरा कांहीं आनुषंगिक पुरावा आम्हांस उपलब्ध झाला आहे, तो आम्ही येथें नमूद करितों. हा पुरावा मांडण्या पूर्वी शहाजी राजे यांनीं विजापुराहून शिवाजी महाराजांची रवानगी, दादोजी कोंडदेव यांच्या बरोबर त्याच्या पुणे व सुपें या दोन जहागिरीच्या प्रांता कडे जेव्हां केली, तेव्हां पासून तों शके १५६७ सालांत मसूर येथें समर्थ रामदास स्वामींनीं प्रथमचा रामजन्मोत्सव केला तों पावेतों, मसूर येथें व आस-पासच्या प्रांतांत शहाजी राजे व शिवाजी महाराज यानीं स्वराज्यस्थापनेच्या दृष्टीने ज्या राजकारणी हालचाली केल्या, त्याचें थोडक्यांत दिग्दर्शन करणें जरूर आहे.

शिवाजी महाराजांच्या सप्तप्रकरणात्मक चरित्रांत ( पान २८ ) शिवाजी महाराज व जिजाबाई साहेब यांची रवानगी पुणें प्रांता कडे दादोजी कोंडदेव, पुणें येथील सुभेदार मोजवा देण्यास आले होते, त्यांच्या बरोबर शहाजी राजानीं शके १५५९ म्हणजे इ० स० १६३७ सालांत केली, असें नमूद केलें आहे. त्या च चरित्रांत ( पान ३० ) स्वराज्य स्थापनेच्या मसलतीस शके १५६२ म्हणजे इ स. १६४० सालात प्रारंभ झाला असें नमूद केलें आहे. स्वराज्यस्थापनेच्या खटपटीच्या प्रारंभाचा हा शक बरोबर असला पाहिजे, असें त्या काळच्या उपलब्ध झालेल्या दुसऱ्या पुराव्या वरून दिसून येते. म. इ. सा. खंड १५ लेखांक २६६ व २६७ मध्यें रोहिडखोऱ्यांत शिवाजी महाराजांनीं

स्वराज्यस्थापनार्थ चालविल्या खटपटींचें वर्णन आलें आहे. लेखांक २६६ शके १५६४ सालचा आहे; त्यांतील उल्लेखा वरून शके १५६४ पूर्वी त्या खोऱ्यांत शिवाजी महाराजांनीं त्यांची सत्ता स्थापन करण्याचा प्रारंभ केला होता असें दिसतें. ही गोष्ट लक्षांत घेतली असतां, स्वराज्यस्थापनेच्या मसलतीच्या प्रारंभाचा सप्तप्रकरणात्मक चरित्रांतील शक, जवळ जवळ बरोबर असल्याचें दिसतें. या शका पूर्वी ७ वर्षे अगोदर म्हणजे शके १५५४ सालांत शिवाजी महाराज कृष्णातीरीं जन्मास आल्याची वार्ता, समर्थ रामदासांना गोदातीरीं वास करीत असतां, मागें दिलेल्या वाकेनिशी टिपणांत नमूद केल्या प्रमाणें विदित झाली होती. परंतु भरतखंडभर यात्रा करण्याचा संकल्प समर्थांनीं ठरवून त्यांनीं पर्यटनास सुरवात केल्या मुळें, ते शके १५५६ सालापावेतों कृष्णातटाकीं वास करण्या करिता येऊं शकले नाहींत. समर्थांनीं तीर्थपर्यटन शके १५६६ सालांत समाप्त करून, ते शके १५६७ सालांत कृष्णातटाकीं प्रथम वाई, महाबळेश्वर इत्यादि ठिकाणीं येऊन दाखल झाले. वाई, महाबळेश्वर येथें थोडे दिवस काढून, समर्थ चाफळ खोऱ्या नजीक असलेल्या शाहापूर गावीं त्या सालच्या अखेर वास्तव्य करण्या करितां आले. या पूर्वी या प्रदेशांत शहाजी राजे व छत्रपति शिवाजी महाराज यांनीं स्वराज्यस्थापनेच्या दृष्टीनें कोणत्या राजकारणी खटपटी चालविल्या होत्या, याची यथायोग्य कल्पना वाचकांस आल्या खेरीज दासविश्रामधामांत वर्णिलेला समर्थशिवाजीभेटीचा प्रसंग सभवनीय आहे कीं नाही, या विषयीं वाचकांना निश्चित मत करितां येणें शक्य नाहीं. शहाजी राजे यानीं पुणें व सुपे हे जे त्यांचे जहागिरीचे दोन प्रात, त्यांत वास्तव्य करण्या करितां बाल शिवाजी व जिजाबाई साहेब यांची रवानगी केल्या नंतर, त्या व त्याच्या आसपासच्या प्रदेशांत स्वराज्यस्थापनेच्या प्रथमच्या हालचाली सुरू करण्यांत आल्या. या मुळें मराठ्याच्या इतिहासाच्या अभ्यासकांचें लक्ष या च प्रांताकडे विशेष वेधलें जातें. परंतु या प्रांता प्रमाणे च महाराष्ट्राच्या इतर प्रदेशांत हि या च स्वरूपाच्या ज्या हालचाली सुरू करण्यांत आल्या, तिकडे अभ्यासकांचें लक्ष वेधलें न गेल्या कारणानें त्याचें महत्त्व अद्याप पावेतों म्हणण्या सारखे कोणाच्या लक्षांत आलें नाहीं. स्वराज्यस्थापने प्रीत्यर्थ शहाजी राजे, त्याचे मुत्सद्दी व शिवाजी महाराज यानीं ज्या अनेक खटपटी केल्या, त्यां पैकीं एक महत्वाची खटपट म्हटली म्हणजे त्या काळच्या जमिनीच्या उत्पन्नाचा

राजभाग वसूल करणारे जे प्रांताचे वतनदार, त्यास गोडीगुलाबीनें आपल्या बाजूस वळवून घ्यावयाचें अगर हें न जुळल्यास त्यांच्याशीं विरोध करून व त्यांना सतावून मोडून काढावयाचें, हो होय. प्रत्येक प्रांतांतील जमिनीच्या उत्पन्ना वरील राजभाग वसूल करून, तो सरकारी खजिन्यांत भरणा करण्याचें काम या प्रांताच्या वतनदारा कडे असे. गोडीगुलाबीनें हे वतनदार शिवाजी महाराजांस सामील झाले, म्हणजे अर्थात च त्या प्रांताचा वसूल शिवाजी महाराजांच्या हातांत पडू लागे. या प्रमाणें बादशाही मुलखाचा वसूल शिवाजी महाराजांच्या हातांत पडूं लागला, म्हणजे त्या प्रांताच्या वतनदारा वर सैन्य पाठवून त्याचें पारिपत्य करण्याचा प्रयत्न बादशाही अधिकाऱ्यां कडून होत असे. परंतु शिवाजी महाराजांस हे वतनदार राजीखुषीनें सामील झाले असल्या कारणानें, बादशाही सैन्याचा बीं मोड करणें शिवाजी महाराजांस फार कठीण जात नसे. देशमूख, देशपांडे या वतनदार लोकांचा त्यांच्या प्रांतांतील लोकां वर, त्या काळीं फार वचक असे. त्यांच्या प्रांतांतील कोणत्या हि माणसाची, त्यांच्या मर्जीविरुद्ध वागण्याची छाती सहसा होत नसे. महजर, निवाडापत्रें इत्यादि पुरातन कागदांचें निरीक्षण केलें असतां, देशमुखांस त्या काळीं राजे ही संज्ञा लावण्याचा प्रघात होता. या एका लहानशा बाबी वरून या वतनदार लोकांची सत्ता व वचक त्यांच्या प्रांतातील लोकांवर किती असला पाहिजे, याची कल्पना सहज करतां येण्या सारखी आहे. आतां दर्शविल्या प्रमाणें महाराष्ट्रांतील निरनिराळ्या प्रांताचे देशमूख, देशपांडे इत्यादि वतनदार हे, सत्ता आणि द्रव्य यांचीं केंद्रस्थानें असल्या कारणानें, शहाजीराजे व शिवाजी महाराज यांच्या सारख्या स्वराज्यस्थापना करण्याची आकांक्षा बाळगणारांस, या वतनदारां पैकीं जे कोणी गोडीगुलाबीनें सामील होतील, त्यांस त्या मार्गानें सामील करून घेणें व जे कोणी गोडीगुलाबीनें सामील होणार नाहींत व बादशाही सत्तेशीं राजनिष्ठ राहतील, त्यांस सतावून सोडणें प्राप्त होत असे. मराठ्यांच्या इतिहासाचीं साधनें खंड १५ मध्यें रोहिडखोरें गुप्तेदेशपांडे घराण्याचे कागदपत्र छापिले आहेत. तें घराणें शिवाजी महाराजांच्या कडून वंशपरंपरा मिळणाऱ्या वतनाच्या आमिषा स्तव, त्यांस राजी खुषीनें सामील झालेल्या घराण्यां पैकीं एक घराणें आहे. त्या च खंडांत मसूर येथील जगदळे घराण्याचे कागदपत्र छापिले आहेत. तें घराणें विजापूर अगर मोंगल बादशहाशीं राजनिष्ठ राहून, शहाजी व शिवाजी महाराज यांच्याशीं विरोध करणाऱ्यां पैकीं एक नमुनेदार घराणें होतें. हें घराणें शहाजी राजे व शिवाजी महाराज

यांस गोडी गुलाबीनें सामील न झाल्या कारणानें, त्यांच्या कडून या घराण्याचें अत्यंत नुकसान व खराबी झाली. या घराण्याचे कागदपत्र वरवर पाहाणारास हि या घराण्याच्या कर्मकटकटीची रडकी कहाणी त्यात गाइली असल्याचें दिसून येतें. आतां मसूर येथील बादशाही सत्तेशीं राजनिष्ठ रहाणाऱ्या जगदळे घराण्यास, शहाजी राजे व शिवाजी महाराज याच्या कडून इतक्या प्रखर हालअपेष्टा काय भोगाव्या लागल्या, याचें प्रस्तुत स्थळीं दिग्दर्शन करणें जरूर आहे. या दिग्दर्शनां वरून दासविश्रामधामांत वर्णिलेल्या समर्थशिवाजीभेटीच्या संभवनीयते विषयीं वाचकांची खात्री पटणार आहे.मसूर येथील जगदळे घराण्याचीं मालकीचीं वतनें तीन. मसूरची पाटिलकी, मसूर व कऱ्हाड प्रांताची देशमुखी. या तीन वतनां पैकीं मसूरच्या व कऱ्हाडच्या देशमुखी वतनां बद्दल शहाजी राजे, शिवाजी महाराज व जगदळे घराणें यांच्या मध्ये अनेक वर्षे वाद सुरू होते. मसूरचीं व कऱ्हाडचीं देशमुखी वतनें काय वाटेल तें झालें तरी जगदळ्यास द्यावयाचीं नाहींत, तीं स्वतःच्या अगर स्वपक्षाच्या अशा वजनदार माणसाच्या हातांत ठेवावयाचीं, असें शहाजी राजे व शिवाजी महाराज या पितापुत्रांचें धोरण होतें. या धोरणांत त्यांचा अंतःस्थ हेतु काय होता, हा एक महत्त्वाचा प्रश्न आपल्या पुढे येतो; मसूरच्या व कऱ्हाडच्या देशमुखीचें तत्कालीन राजकीय दृष्ट्या महत्त्व काय होतें, हें लक्षांत येण्या करितां, शिवाजी महाराजांनीं स्थापिलेल्या स्वराज्यांतर्गत मुलखाची भौगोलिक ठेवण व त्यांच्याशीं शत्रुत्वाचें नातें बाळगणाऱ्या विजापूरच्या बादशहाच्या राजधानीचें मुख्य ठिकाण, जें विजापूर शहर यांचा परस्पर संबंध लक्षांत आणणें जरूर आहे. शिवाजी महाराजांनीं स्थापिलेल्या स्वराज्यांत, शहाजी राजे यांचे पुणें व सुपें हे प्रांत प्रथमपासून च समाविष्ट झाले होते. या मुलखांत पुण्याच्या उत्तरे कडील चाकण परगणा शिवाजी महाराजांनी सामील केला. त्या नंतर पुण्याच्या दक्षिणे कडील रोहिड खोऱ्यांतील रोहिडा किल्ला त्यांनीं काबीज केला. या प्रमाणें दक्षिण बाजूस क्रमाक्रमानें सह्याद्रीचे डोंगर व त्याच्या पूर्व बाजू लगतचा मुलूख शिवाजी महाराज काबीज करीत व स्वराज्यांत सामील करीत चालले. या प्रमाणें दक्षिण बाजूस कऱ्हाड पावेतों स्वराज्याचा विस्तार झाला. त्या काळीं पश्चिमे कडून पूर्व बाजूस जाणारा,दक्षिण दिशेकडे कलता असा एक मोठा मार्ग कऱ्हाड कडून विजापूर कडे जात असे. हल्लीं हि तो मार्ग अस्तित्वांत आहे. शिवाजी महाराजाच्या दक्षिणोत्तर पसरलेल्या स्वराज्यांतर्गत मुलखा वर

त्वरित चढाईचा हल्ला करण्याला हा मार्ग फार सोईचा होता. या मार्गा वरील सह्याद्रीच्या डोंगरालगतच्या पूर्व बाजूच्या मोकळया मुलखांतील महत्वाचीं ठिकाणें म्हणजे चाफळ, मसूर, कऱ्हाड हीं असल्या मुळें स्वराज्यांतील मुलखाच्या रक्षणार्थ तीं आपल्या ताब्यांत ठेवण्याची आवश्यकता शिवाजी महाराजांस वाटत असे. शिवाजी महाराजांच्या स्वराज्यस्थापनार्थ हालचाली सुरू होण्या पूर्वी च, शहाजी राजे यांच्या लक्षांत या स्थळांचें महत्त्व येऊन चुकलें होतें. आम्ही या पुढें या मुद्याच्या चर्चेच्या दृष्टीनें जो पुरावा नमूद करणार आहोंत, त्या पुराव्या वरून मसूर येथें शहाजी राजे यांनीं कोट बांधून, त्या ठिकाणीं सैन्य ठेवल्याचें दिसून येणार आहे. आतां पावेतों केलेल्या विवेचना वरून, कऱ्हाड व मसूर या दोन ठिकाणांचें महत्त्व, शिवाजी महाराजांनीं स्थापिलेल्या स्वराज्याच्या संरक्षणाच्या दृष्टीनें कोणत्या प्रकारचें होतें, हें स्पष्ट झालें आहे. स्वराज्यस्थापनेच्या दृष्टीनें अशीं जीं हीं महत्त्वाचीं स्थळें, तीं ज्या प्रांतांत होतीं, त्या प्रांतांत समर्थ शके १५६६ सालांत येण्या पूर्वी, शहाजी राजे व शिवाजी महाराज यांच्या, हीं स्थळें आपल्या ताब्यांत ठेवण्याच्या बाबतींत, कोणत्या प्रकारच्या हालचाली झाल्या होत्या, हें दर्शविणारे कांहीं महत्त्वाचे उल्लेख, म. इ. सा. खंड १५ मध्यें आलेले, जरूरी पुरते खालीं उतरून घेऊन त्यां संबंधीं थोडी बहुत चर्चा आम्ही या ठिकाणीं करितों

( १ ) " कराडाबादेचा देसपांडा याचा एक भाऊ रुद्राजी चंदो हा धनाजीस मिळोन पदाजी यादवास व पदमोजी यादवास घेऊन लस्करांत एऊन फिरादी करवितो " ( म. इ. खंड १५ पान १ )

( २ ) हा व धनाजी जाधव यानें मुलुकामध्यें आपले स्वार व प्यादे पाठविले आहेत कीं, कोण्ही जमीनदार महादजी देशमूख मसूरकर याची शाहादी ध्याल म्हणजे मारले जाल. म्हणोन धनाजीचा भाऊ रयतास धरून नेऊन मुचलके घेताती. ऐसे मजवरी जुलूम करून माझें कराडीचें वतन घेतलें व मसूरचें घेऊं म्हणोन कराडीचा देसपांडे याचा भाऊ रुद्राजी चंदो यास धनाजीनें बा। देऊन प्रत्यक्ष गणीम मजवरी उभा केला आहे हे गोष्ट लटकी जाली तरी पातशा मज सजा पोहोचविते. "

( म. इ. सा. खंड १५ पान २ )

( ३ ) " या उपरि निजामशाहींतून शहाजी राजे भोसले हे विज्यापुरास आले. पादशहानी मनसफ दिल्ही. ते वख्ती यादवाचे भाऊबंद शाहाजी राजाकडे चाकर होते. शाहाजी राजे भोंसले यास यादव मिळोन देशमुखी

कराडची शहाजी राजाकडे केली. हे वर्तमान आबकोन कर्नाटकामध्यें बेंगरुळास आपला आजा नरसोजी जगदळा गेला तेथें शाहाजी राजाची भेट घेतली. त्यास कऱ्हाडीचे देशमुखीची हकिकती सांगितली. ते वख्ती यादव व शाहाजी राजे यानीं विचार करून दगा देऊन आपला आजा नरसोजी जगदळा मारिला. आपला बाप व आपला चुलता होता. त्याउपरी शाहाजी राजानीं पिसळे म्हणून एक मऱ्हाठे चाकरीस ठेविले होते त्यास लावून देऊन मसुरीचे मोकदमीवरी दावा करविला. आणि मसूर परगणा शाहाजी राजानीं जहागीर घेतली. आणि मसुराच्या कोटामध्यें आपले ठाणें ठेविलें. ते वख्ती पिसळ्यास लावून देऊन मसुरीची पटेलगी व देशमुखी अनामत केली आणि दादाजी कोंडदेऊ शाहाजी राजाकडील सुभेदार त्यास सांगोन पिसळयास व आम्हास! लावून दिल्ह........ ...... .. ... ........ या उपरी भोसल्यानीं ठाणातील लोक काढून पिसळयाचे नाव सारून आपला चुलता तानाजी जगदळा जीवें मारिला. आणि मागती देसमुखी शाहाजी राजानीं आपल्याकडे घेतली. आपला बाप पटेलगी करून होता. आपला जीव वाचवून देशमुखीचें नांव काढिलें नाहीं. या उपरी भोसल्याची जबरदस्ती देखोन आपला जीव वाचवून होते या उपरी शाहाजी राजाचा लेक शिवाजी राजा जाहाला. त्यानें पुंडाव करून पादशाहासी बिघाड केला ते वख्ती आपला बाप पादशाही फौजेस मिळोन व देशमुखीचा मजकूर करून देशमुखी घेऊं लागला. अबदुलखान हा जाउलीत बुडविला तेथें भोसल्यांच्या सरदारांनीं पाळत करून वसंतगडास आणिला आणि त्याची गर्दन मारिली. ते समयीं आपलें नेणतपण होतें. आपण धाकुटे होतो. मग आपली आई व आपण पळोन सातारास गेलों. तेथून आपली आई रायगडास जिजाई आवा, शिवाजी राजाची आई तापासी गेली कीं, माझेच वतन घेऊन आपले तीन खून केले आपले पोटीं एक मूल आहे त्यास कौल दिल्हा पाहिजे. ते वख्ती शिवाजी राजे बोलिले कीं, देशमुख गोष्टी न करावी, कौलच आहे, देशमुखी गोष्टी न काढावी ऐसें लिहिलें आपले आईपासून घेतलें कीं पटेलगी करून असावें ऐसा कौल घेऊन मग आपले आईनें नेऊन शिवाजी महाराजांस भेटविलें. त्यानी वेंकाजी दत्तो याचे हातीं घेऊन पटेलगी हुमाला करून मसुरास पाठविलें." ( म. इ. सा. खंड १५ पान १६ )

वरील उताऱ्या वरून हें स्पष्ट सिद्ध होत आहे कीं, शहाजी राजे निजामशाही सोडून विजापूरच्या बादशहाच्या पदरीं राहिल्या नंतर, कऱ्हाडची

देशमुखी त्यांनी बळजबरीनें जगदळ्या पासून हिसकावून घेतली. त्या नंतर या देशमुखीच्या बाबतींत नरसोजी जगदळा, बंगलोरास शहाजी राजे यांच्या भेटीस गेला असतां त्यास जिवें मारिलें. पुढें मसूरची देशमुखी बळजबरीनें जगदळ्या कडून काढून घेण्यांत आली. मसूर प्रगणा शहाजी राजे यानीं विजापूरच्या बादशहा कडून जहागीर मिळविला व मसूरच्या कोटा मध्यें त्यानीं आपलें ठाणें ठेविलें. माहादाजी जगदळे याची आई मसूरच्या देशमुखीच्या व पाटील कीच्या वतना बद्दल खटपट करण्या करितां, रायगड येथें शिवाजी महाराज व जिजाबाई साहेब यांच्या कडे गेली; परंतु मसूरच्या देशमुखी बद्दल गोष्ट काढू नये, पाटिलकी करून स्वस्थ असावें असा जबाब तिला मिळाला. शहाजी राजे यांच्या या वतना संबंधींच्या वरील सर्व खटपटींत सामील असलेल्या व प्रामुख्यानें भाग घेणारां पैकीं, कऱ्हाडचे देशपांडे रुद्राजी चंदो देश कुळकर्णी ही एक प्रमुख व्यक्ति होती. कराड व मसूर येथील वतना संबंधीं एका बाजूस जगदळे घराणें व दुसऱ्या बाजूस शहाजी राजे व शिवाजी महाराज यांच्या दरम्यान जो वाद चालला होता, त्याचें खरें मर्म रुद्राजी चंदो यास पूर्णपणें अवगत होतें रुद्राजी चदो ही व्यक्ति कोणत्या दर्जाची होती, हें म. इ. सा. खंड २१ लेखांक १३२ व १३६ वरून सिद्ध होतें. कऱ्हाड क्षेत्रींच्या ब्राह्मणास इनाम दिलेल्या जमिनीच्या बाबतींत, पंत अमात्य यास रुद्राजी चंदो यानें लिहिलेलीं हि पत्रें आहेत. या पत्रां वरून रुद्राजी चंदो ही, त्या काळीं एक वजनदार व्यक्ति होती हें सिद्ध होतें. जेधे शकावलींत (पा. १७८) शके १५४७ सालात निजामशहास माहुलीच्या वेढ्यांत कैद करण्यांत आलें व शाहाजी राजे इदलशाही नोकर झाले, असें नमूद केलें आहे. पंधराव्या खंडातील जे उतारे वर दिले आहेत, त्यां मध्यें शहाजी राजे हे अदिलशाही नोकर झाल्या वर, त्यांनीं मसूरच्या देशमुखी वतना संबंधीं त्या उताऱ्यांत दर्शविलेल्या खटपटी केल्याचें नमूद आहे. या गोष्टी बरोबर च याच शकावलीच्या (पा. १७९) शके १५७१ सालाच्या नोंदींतील खालीं नमूद केलेला मजकूर ध्यानांत आणला, म्हणजे स्वराज्यस्थापनेस पोषक अशा प्रकारच्या ज्या अनेक गोष्टी शहाजी राजे यांनीं करण्याचें योजिलें होतें, त्यां पैकीं मसूर व कऱ्हाड या परगण्याची देशमुखी वतने संपादन करावयाचीं, ही एक गोष्ट होती असें बळकट अनुमान निघतें.

शके १५७१ विरोधीनाम संवछर जेष्ठ शुद्ध पूर्णिमा शहाजी राजे कोंढाणास येऊन सोडिले ते समयीं कान्होजी नाईक जेधे व दादाजी कृष्ण लोहोकरे यास सोडिले.

ते समई माहाराज बोलिले कीं "तुम्ही आम्हांमुळें बंदीवानी श्रमी जालेस या उपरी आम्ही पातशहासी तह केला कीं, बारा गांवांतून मजुरा करून हुकुमप्रमाणें कर्नाटक प्राते मसलत करावी. त्यावरून बेगरूल प्रांत पाचा लक्षा होनाचा जाहागिर दिल्हा आहे. चिरंजीव राजश्री सिऊबा खेडे बारियांत व पुणा आहेत त्याजवळ तुम्ही जमावानसी राहावें तुमची जबरदस्ती त्या प्रांतें अवघे मावळचे देशमुख देखील त्यासी रुजू होऊन त्याचे आज्ञेत वर्तत येसा विचार करून जबरदस्तीनें राहावें. येखादी मोगलाई कडील फौज व इदलशाहीकडील फौज आली तरी आपण इमान राखाव त्यासी लढाई करावी येसी शफत इमान पुरस्कर बेलरोटीवर हात ठेवून घेतली तैसचि त्याणीही कान्होजी नाइ-कास शेफत दिली अणी कान्होजी नाईक यांस व दादाजी कृष्ण यास वस्त्र देऊन बराबर हुजऱ्या व पत्रें देऊन राजश्री सिवजी राजे यांजकडे पाठविलें "*

दासविश्रामधामांत समर्थ रामदास व शिवाजी महाराज यांच्या भेटीचा जो प्रसंग नमूद केला आहे, त्या पूर्वी शाहापूर, मसूर, कऱ्हाड, इत्यादि ठिकाणें व त्याच्या आसपासच्या प्रदेशांतील राजकीय वातावरण स्वराज्यस्थापनेच्या दृष्टीनें कोणत्या स्वरूपाचें बनलें होतें, याचें दिग्दर्शन आम्ही येथ पावेतों केलें. अशा प्रकारच्या वातावरणांत स्वधर्म स्थापने स्तव रामराज्य निर्माण व्हावें, अशा प्रकारचें ध्येय मनांत बाळगणारे समर्थ रामदास स्वामी अवतीर्ण झाले व त्यांनीं रामराज्य स्थापने प्रीत्यर्थ रामनवमीचा उत्सव करण्यास प्रारंभ केला.

---

* टीप—" महाराष्ट्रांतील ऐतिहासिक पुरुषांच्या मुद्रांचें प्रदर्शन " हा आमचा लेख इतिहास आणि ऐतिहासिक मासिकांत छापून प्रसिद्ध झाला आहे. त्या लेखांत शहाजी राजे यांच्या पूर्वत्र्यांत स्वराज्यस्थापनेच्या कल्पनेस मूर्त स्वरूप देण्यास त्यांच्या मार्गांत कोणत्या अडवणी होत्या व निजामशाही बुडाल्या वर त्या कल्पनेस मूर्त स्वरूप देण्यास अनुकूल भूमी कशा रीतीनें तयार झाली व स्वराज्यस्थापनेची कल्पना शहाजीराजे याची च असून तिचा उपक्रम छत्रपति शिवाजी महाराजांच्या ठिकाणीं असणाऱ्या अलौकिक गुणाच्या योगानें त्यांच्या च करवीं करण्याचा संकल्प त्यांनीं कशा रीतीनें अमलांत आणिला इत्यादि मुद्यांचें विवेचन आम्हीं केलें आहे. जगदळे घराण्यांच्या कागदपत्रांतील जे उतारे आम्ही वर दिले त्यांतील हकीकत लक्षांत घेतां आम्ही त्या लेखांत काढलेल्या अनुमानास चांगली बळकटी येत आहे.

या प्रमाणें समर्थांनीं कार्यास सुरवात केल्या नंतर अंबाजी (कल्याण), दत्तात्रय, रुद्राजी, हे त्यांचे शिष्य झाले. दासविश्रामधामांतील रुद्राजी हा दुसरा तिसरा कोणी नसून, रुद्राजी चंदो देशकुळकर्णी हा च असला पाहिजे, असा तर्क होतो. म. इ. सा. खंड १५ मधील पान १९ वर रुद्राजीपंत देश कुळकर्णी यांचें नांव एका महजरांत नमूद असलेलें आढळतें. समर्थ रामदास स्वामींच्या बखरींत कऱ्हाडच्या रुद्राजीपंत देशपांड्याची कन्या अक्काबाईनें समर्थांचा अनुग्रह घेतल्याचें (रामदास बखर पान ७२) नमूद आहे. या सर्व गोष्टी डोळ्या पुढें ठेविल्या वर स्वामींनीं, " ठाईं ठाईं शोध घ्यावा। मग ग्रामीं प्रवेश करावा।" (दा. १९-२-१७) असा उपदेश केला आहे, अशा समर्थ रामदास स्वामींना मसूर येथें वास्तव्य करावयास लागल्या वर, तेथील राजकीय परिस्थिति व त्यास परिचित झालेल्या रुद्राजीपंतांनीं चालविलेल्या खटपटी विदित झाल्या नाहींत, असें विधान करणें युक्तीस धरून होणार नाहीं. जगांत चाललेल्या अनेक घडामोडी विषयीं प्रत्येक मनुष्यास येणाऱ्या सर्वसाधारण अनुभवाच्या दृष्टीनें विचार केला असतां, मसूर, कऱ्हाड इत्यादि ठिकाणें व त्याच्या आसपासच्या प्रदेशांतील राजकीय वातावरण आणि त्या वातावरणांत प्रामुख्यानें वावरणाऱ्या रुद्राजी चंदो सारख्या खटपटी व्यक्ति, या विषयींची समर्थ रामदासस्वामींना पूर्ण माहिती झाली असली पाहिजे, या अनुमाना-खेरीज दुसरें अनुमान काढणें शक्य नाहीं. रुद्राजीपंता सारख्या माणसाचा समर्थ रामदासस्वामींशी दाट परिचय झाल्या वर, समर्थांचें ध्येय कोणत्या स्वरूपाचें आहे, याची वार्ता छत्रपति शिवाजी महाराज यांच्या काना वर तावडतोब गेली असली पाहिजे; ही वार्ता त्यांच्या काना वर गेल्या नंतर, दासविश्रामधामांत वर्णिल्या प्रमाणें समर्थांच्या भेटी विषयीं शिवाजी महाराजांची आतुर इच्छा होऊन, त्यांनीं समर्थ रामदास स्वामींची गांठ घेतली असली पाहिजे, हें अनुमान ओघानें च प्राप्त होतें. मानवी समाजांत कार्यकर्ता पुढारी जे नूतन विचार तरंग व त्यास अनुसरून ज्या अनेक हालचाली निर्माण करितो, त्यांची वार्ता त्या च समाजांतील समान विचार असलेल्या दुसऱ्या कार्यकर्त्या पुढाऱ्यांच्या कानांवर त्वरित आदळून, परस्परांचें परस्परां कडे आकर्षण होण्यास तावडतोब सुरवात होते. या प्रमाणें कार्यकर्त्या पुरुषांचें परस्परां कडे आकर्षण झाल्यावर, पर-स्परांच्या भेटी व परस्परांचा विचार विनियम तात्काल घडूं लागतो. कार्यकर्त्या पुरुषांची त्यांच्या ध्येया विषयीं इतकी तीव्र निष्ठा असते, कीं, समान विचा-रांच्या कार्यकर्त्या पुरुषांचा वियोग असह्य होतो व अशा प्रकारचे कार्यकर्ते

पुरुष परस्परांस धुंडाळित येतात; हा हरहमेश येणारा अनुभव लक्षांत घेतां, दासविश्रामधामांतील समर्थशिवाजीभेटीचा प्रसंग घडला असला पाहिजे, या विषयीं बिलकूल शंका राहात नाहीं. प्रचलित राजकारणां पैकीं एक दृष्टांत देऊन आमचें म्हणणें वाचकांना विशद करून देण्याचा आम्ही अल्प प्रयत्न करितों. प्रस्तुत काळीं खादीचा कपडा परिधान करण्याच्या ध्येयाचा उपदेश व प्रसार महात्मा गांधी हे करीत आहेत. माहात्माजींचें वास्तव्य ज्या अहमदाबाद शहरीं आहे, त्या ठिकाणा पासून बिहार प्रांतांतील पाटणा शहर पांच सहाशें कोस लांब आहे या प्रांतांतील पाटणा शहर हें राजेंद्र प्रसाद बाबूंचें निवासस्थान आहे. महात्मा गांधी सारखे खादीच्या ध्येयाचे हे एक निःसीम भक्त असून, या ध्येयाच्या प्रसारा प्रीत्यर्थ ते हि जोराची खटपट करीत आहेत. खादीच्या ध्येयाच्या प्रसारार्थ भरतखंडांत प्रथम हालचाल सुरू झाल्या पासून गांधी व राजेंद्र प्रसाद याच्या गांठी अनेक प्रसंगीं होऊन, परस्पराचा परस्परांच्या हालचालींस पाठिंबा असल्याचें, भरतखंडांतील जाणत्या लोकांस विदित आहे. हें दोनशें वर्षां नंतर खादीच्या ध्येयाचा एकाद्या इतिहास लेखकास महात्मा गांधी आणि राजेंद्र बाबू याच्या भेटी खादीच्या चळवळीच्या प्रारंभापासून च होऊन, परस्परांची सहानुभूति परस्परांच्या हालचालींना होती, या संबंधाचा पत्रव्यवहारादि लेखी पुरावा उपलब्ध न झाला व फक्त महात्मा गांधींच्या त्या काळीं अस्तित्वांत असलेल्या एकाद्या चरित्रांतील, राजेंद्रबाबू व महात्माजी यांची भेट एकाद्या विशिष्ट सालीं झाल्याचा उल्लेख आढळला तर ती इतिहासकार या दोघांच्या भेटी त्या विशिष्ट सालाच्या पूर्वी कधीं च झाल्या नव्हत्या, असें प्रतिपादन करण्यास प्रवृत्त होईल; व आजमितीस विद्यमान व अनेकांस विदित असलेली बाब, अन्य लेखी पुराव्याच्या अभावीं असंग सदरांत टाकून चरित्रांतील विशिष्ट सालाच्या पूर्वी, महात्मा गांधी व राजेंद्रबाबू यांची भेट च झाली नव्हती, असा सत्य (!) सिद्धांत प्रतिपादिण्यास तयार होईल. या दृष्टांतांतील मर्म लक्षांत घेऊन, समर्थ रामदासस्वामी व छत्रपति शिवाजी महाराज यांचा अन्योन्यसंबंधाची दासविश्राधामांतील हकीकत व मसूरकर जगदळे यांच्या कागदपत्रां पैकीं, वरील उताऱ्यांत नमूद करण्यांत आलेल्या महत्वाच्या बाबी यांचा समवेत विचार केला तर समर्थ रामदास स्वामी व छत्रपति शिवाजी महाराज या उभयतांची भेट, छत्रपति शिवाजी महाराजांच्या पूर्व वयांत च झाली होती व परस्परांच्या ध्येयाची व त्याच्या सिध्यर्थ त्यांनीं

चालविलेल्या हालचालींची माहिती हि परस्परांस प्रथम पासून च झाली होती, हें ऐतिहासिक सत्य आहे, असें आपणास ग्राह्य करण्या वाचून गत्यंतर नाहीं.

समर्थ रामदास स्वामी आणि छत्रपति महाराज यांचा परस्पर संबंध, शिवाजी महाराजांनीं स्वराज्यस्थापनेस प्रारंभ केल्या नंतर पांच सहा वर्षांत च जुळून येऊन, त्याची व छत्रपति यांची भेट मसूर येथील रामजन्मोत्सव प्रसंगीं घडली, हें आम्हीं आता पावेतों केलेल्या विवेचना वरून सिद्ध झालें असून शके १५९४ पूर्वीं रामदासाची आणि छत्रपतींची भेट झाली होती, हा मुद्दा स्थापित करण्याचें कार्य झालें आहे. तथापि आम्हीं स्थापित केलेला सिद्धांत ग्राह्य करण्या विषयीं अद्याप हि कोणाचीं मनें साशंक असल्यास, शके १५९४ पूर्वीं समर्थ व शिवाजी महाराजांची भेट झाली होती, हें खात्रीनें सिद्ध करणारा पुरावा आतां आम्ही नमूद करितों. श्रीमंत महाराज भोंसले यांची बखर मराठी दफ्तर रुमाल १ ला हा ग्रंथ के विनायकराव भावे यांनीं कांहीं दिवसां पूर्वीं प्रसिद्ध केला आहे. या ग्रंथात समर्थशिवाजीसंबंधा विषयीं दिलेल्या हकीकतींत समर्थ रामदास स्वामींचा उल्लेख आलेला आहे. ही हकीकत येथें जशीच्या तशी च नमूद करण्या पूर्वीं बखरकारानें या प्रसंगा पूर्वीची जी हकीकत दिली आहे, तिचें क्रमानें आम्ही थोडक्यात दिग्दर्शन करितों. जावळीकर चंद्रराव मोरे याचे राज्य भेदनीतीनें बुडविल्या वर शृंगारपूरच्या सुर्व्यांच्या ताब्यांतील शिवथर खोरें शिवाजी महाराजांनीं हस्तगत केलें. नंतर किल्ले रायगड येथें शिवाजी महाराज राहूं लागले तुळजापुरची भवानी, छत्रपति शिवाजी महाराजाची कुल स्वामिनी. हिच्या दर्शनास दरसाल जाण्याचा शिवाजी महाराजांचा नियम असे. देवीचें देऊळ पातशाही मुलखातील तुळजापूर गावीं असल्या मुळें, दर्शनास जाणें शिवाजी महाराजांस धोक्याचें होतें; या स्तव रायगड येथें देवीची स्थापना करावी, असें शिवाजी महाराजांच्या मनांत शके १५७५ त आलें. या नंतर मबाजी बीन गोमाजी नाईक सोनवणी यांस गंडिकेस पाठवून, देवीची मूर्ति तयार करण्या करितां उत्तम शिळा आणविण्या बद्दल शिवाजी महाराजांनीं आज्ञा केली. मबाजीनें तिकडे जाऊन उत्तम शिळा व शिल्पांकार हुनखंद कारागर यास रायगडीं आणिलें. नंतर शिवाजी महाराजांच्या स्वप्नांत देवी येऊन, महाबळेश्वराच्या पश्चिमेस ढोरप्या डोंगर आहे, तेथें किल्ला बांधून व त्या ठिकाणीं देवालय करून माझी स्थापना करावी, असा तिनें दृष्टांत दिला. हा दृष्टांत झाल्या वर शिवाजी महाराजांनीं त्या डोंगराचा तपास केला. तेथें केदारेश्वराचें जुनें देऊळ असल्याचें त्यांस आढ-

कून आलें. तें देऊळ प्रथम बांधून, त्याच्या नजीक च देवीचें देऊळ व नवीन किल्ला बांधण्याची, त्याचे पेशवे मोरोपंत पिंगळे यांस आज्ञा केली. मोरोपंत पिंगळे यांनीं छत्रपतींच्या आदेश अनुसरून, देवळें व किल्ला बांधून तयार केला. या प्रमाणें हकीकत बखरकारांनीं नमूद केल्या वर देवीच्या स्थापनेविषयींची हकीकत खालील प्रमाणें वर्णिली आहे:--

" श्री देविची स्थापना करावयाचा मुहुर्त पाहून मोठे मोठे शिष्ट ब्राम्हण व रामदास स्वामी असे सहीत येऊन मुहुर्तांची सिद्धता म्हणजे नेम केला श्री रामदास स्वामींनी देविची मुर्त पाहुन शिवाजी राजे यास स्वामींनी पुसीले की देविची स्थापना कोणाचे हातुन करविता ते समई शिवाजी राजे याणी स्वामीस विनंति केली की स्थापना करण्यास मलाच सर्वत्र मंडळीचे म्हणणे आहे त्याजवरून स्वामीची आज्ञा जाहिली की हे देविचे मुर्तीचे ध्यान अती अपुर्व जाहाले आहे सिऊवा तुम्ही क्षत्रीय तुमच्या हातुन स्थापना जाहली असता ब्राम्हण लोक दर्शन घेण्यास योग्य नाहींत मग स्वामाची आज्ञा राजे यानीं मान्य करून ते समई मोरो पंडित पिंगळे प्रधान याचे कुटुंब बरो-बर च होते, त्यास राजे याची आज्ञा होऊन त्यांचे हातुन सुमुहुर्तानें देविची स्थापना केली आणि पेशवे प्रधान यास मुजुमदारी व सवस्थानचा कारभाराचा अधिकार व किल्याचा सुभा मोरोपंत पंडित पिंगळे प्रधान यास सांगितला. व पुजक व पुराणीक व सोनवणी हावलदार यास अधीकार आपआपले कामाचा दिल्हा व श्री देविचे नावे गाव सरमजाम इनाम करून देऊन चौघडे वगैरे कारखान्याचे राज्यनीती प्रमाणे चालु केले आणि ढोरप्या डोंगराचा किल्ला बांधल्यावर त्या किल्याचे नाव प्रतापगड असे ठेविले. "

वरील उल्लेखा वरून शके १५७५ च्या पूर्वी समर्थांची व शिवाजी महाराजांची भेट झाली असली पाहिजे, हें सिद्ध होतें समर्थांच्या बखरींत शके १५७१ हें जें अनुग्रहाचे साल दिलें आहे, तें जरी ग्राह्य न धरिलें, तथापि प्रथम भेटीचा उल्लेख ज्या शके १५९४ च्या पत्रांत आहे, त्या पूर्वी १९ वर्षें समर्थ व छत्रपति यांची गांठ झाली होती, याबद्दल शंका सहात नाहीं. या बखरींत छत्रपति शिवाजी महाराजां विषयीं कित्येक नवीन बाबी नमूद केल्या असून, कांहीं हकीकतीचे शक ही नमूद केलेले आहेत. बखरकारानें हे शक आपल्या डोक्यां-तून काल्पनिक काढून नमूद केले आहेत, असें म्हणण्याचें कोणी धारिष्ट

करीलसें वाटत नाहीं. हा मुद्दा लक्षांत घेतां बखरीतील वर दिलेली हकीकत कोणीं सबळ कारण दाखविल्या खेरीज असत्य मानणें केव्हां हि वाजवी होणार नाहीं. समर्थशिवाजीसंबंधा विषयींच्या आजपावेतो झालेल्या चर्चेत, वरील हकीकत कोणीं हि पुढें आणिली नसल्या कारणानें, ती येथें मुद्दाम नमूद केली आहे.

भोंसले बखरीतील वरील हकीकतीस, तुळजा भवानी विषयीं समर्थांची जी भक्ति होती व या देवते बद्दल जे त्यांचे उद्गार आढळतात, त्या वरून चांगली च बळकटी येते. सां. वि. वि. द्वितीय खंड लेखांक ६३ मध्यें तुळजा भवानी विषयीं समर्थांच्या उद्गारांच्या बाबतींत विस्तृत चर्चा आमचे मित्र रा. शंकर श्रीकृष्ण देव यांनीं केली आहे. या लेखाच्या शेवटीं प्रतापगडचा किल्ला शके १५७८ त बांधिला गेला व किल्ल्या वर देवीची स्थापना शके १५८१ मध्यें समर्थांच्या सांगण्या वरून झाली हें

रामवरदायनी माता । दासें धुंडून काढिली ।

या वचना वरून माझें अनुमान आहे, असे देवांनीं म्हटलें आहे. प्रतापगडचा किल्ला व देवीचें देऊळ कोणत्या सालीं बांधण्यांत आलें, हें भोंसले बखरींत नमूद नाहीं. परंतु शके १५७५ नंतर हे काम लवकर च झाले असलें पाहिजे असें दिसतें. किल्ला व देवीचें देऊळ बांधण्याचीं दोन्ही कामें बरोबर च सुरू असल्या कारणानें, देवांच्या मता प्रमाणें किल्ला बांधण्याचे काम शके १५७८त झालें, त्या च सालीं देवीची हि स्थापना झाली असली पाहिजे हे अधिक सयुक्तिक दिसतें. अफजलखानाचा वध शके १५८१ मार्गशीर्ष मासीं प्रतापगड किल्ल्याच्या माचीस झाल्याचें जेधे शकावलींत नमूद आहे. या वरून प्रतापगड किल्ला व त्या वरील देवीचें देऊळ यांचें बांधकाम शके १५७८ सालांत पुरें झालें असलें पाहिजे. प्रतापगडच्या देवीस ‘ रामवरदायिनी ’ असें म्हणत. छत्रपति शिवाजी महाराजांची तुळजापुरची भवानी ही जशी कुलदेवता होती, त्या च प्रमाणें ती रामदासांची हि होती. तुळजापूरच्या भवानी विषयीं समर्थांचे कांहीं उद्गार खालील प्रमाणें आढळतातः—

“ प्रसिद्ध तुळजा माता । श्रीरामवरदायनी ।
कुळासी पाळिलें मूळीं । आतां आम्हासी पाळिते ॥

\+ + + + + +

प्रतापगिरीचे ठाईं । आदिशक्ती विराजते ।
कामना पुरती तेथें । प्रचीती रोकड्या जनीं ॥

तुळजापुरीची माता । प्रतापें चि प्रगटली ।
आदिशक्ती माहंमाया । कुळीची कुळस्वामिणी ॥

\+ + + + + +

विवेक विचारसावधपणें । दीर्घ प्रेत्न केला चि करणें ।
तुळजावराचेनि गुणें । रामें रावण बुडविला ॥
ऐसी हे तुळजाभवानी । प्रसन्न रामवरदायेनी ।
रामदास ध्यातो मनीं । इचं निमित्य ॥

वरील उद्गारां वरून समर्थांची तुळजा भवानी विषयीची भक्ति शिवाजी महाराजां प्रमाणें च होती, असें दिसून येतें. या उद्गारांत समर्थांनीं देवीचा प्रताप व तिच्या भक्ती पासून होणारा लाभ यांचें केलेलें दिग्दर्शन लक्षांत ठेवण्यासारखें आहे.

येक चि मागणें आतां । द्यावें तें मजकारणें ।
तुझा तूं वाढवीं राजा । सीघ्र आम्हा चि देखतां ॥
दुष्ट संव्हारिले मागें । ऐसें उदंड ऐकतों ।
परंतु रोकडे कांहीं । मूळ सामर्थ्य दाखवीं ॥
देवाचीं राहिलीं सत्वें । तूं सत्व पाहसी किती ॥
भक्तांसी वाढवीं वेगी । इच्छा पूर्ण परोपरी ॥
रामदास म्हणे माझें । सर्व आतुर बोलणें ।
क्षमावें तुळजे माते । इच्छा पूर्ण चि ते करीं ॥

तुळजा भवानी बद्दलचे समर्थांचे उद्गार या प्रकारचे आहेत; व त्या वरून देवी विषयींची त्यांची निःसीम भक्ति दिसून येते. श्रेष्ठांनीं तुळजा भवानीस नवस केला होता * तो त्यांच्या हातून फेडला न गेल्या कारणानें समर्थांनीं एक सुवर्णपुष्प तयार करून तें देवीस अर्पण केलं व नवसाच्या ऋणांतून श्रेष्ठांस मुक्त केलें. हा नवस फेडण्याच्या प्रसंगीं समर्थांनीं केलेल्या देवीच्या वर्णनपर काव्याच्या शेवटीं त्यांनीं देवीपाशीं वरील मागणें मागितलेलें आहे. तुळजापूरच्या भवानी विषयींची समर्थ रामदास स्वामी आणि छत्रपति शिवाजी महाराज यांची निःसीम भक्ति लक्षांत घेतां भोंसल्यांच्या बखरींतील वर नमूद केलेली माहिती खरी असली पाहिजे असें च अनुमान काढणें सयुक्तिक होईल.

आतां शके १५९४ पूर्वी समर्थांचा व शिवाजी महाराजांचा दाट परिचय होता, असें दर्शविणाऱ्या दुसऱ्या एका गोष्टीचा आम्ही एथें उल्लेख

* टीप— रामदासांची कविता प्रथम खंड पान ३९३ पाहा.

करितों. समर्थांचें वासुदेव महंत या नांवाचे एक शिष्य होते. वासुदेव महंतांची योग्यता समर्थांच्या तोडीची समजत असत.

वासुदेव नामा अनुष्ठानीं । समर्थप्रतिमा ह्मणती जनीं ।
उत्कट परमार्थ विस्तारुनी । समर्थ चरणीं लीन राहे ॥
( स. प्र. १०-१४ )

अशा योग्यतेचे जे वासुदेव महंत त्यांच्या विषयीं शिवाजी महाराजांची भावना खालील प्रकारची होतीः--

शिवराज वासुदेव महंतासी पाही । अति दर्शन लालसासी श्रेष्ठासी वियोग नाहीं । येरवीं कोणहासी ही समर्थ वियोग न सोसवे कांहीं । ध्यानीं मनीं चिंतनीं सर्वदा ॥

या वासुदेव महंतास शंभु छत्रपतींची राज्याभिषेक शके ७ मधील एक सनद प्रसिद्ध झाली आहे. ( सां. वि. वि. पा. १९४ )

या सनदेंत छत्रपति शिवाजी महाराजांनीं शके १५९३ मध्यें मांढरदेव परगणे वाई या गांवीं वासुदेव महंतास जमीन इनाम दिल्याचा उल्लेख आहे. ज्या वासुदेव महंता विषयीं शिवाजी महाराजांची भावना वरील ओंव्यांत वर्णिल्या प्रमाणें होती, त्यांचे गुरु समर्थ रामदास यांच्या विषयीं छत्रपतींना वार्ता हि नव्हती व त्यांची कधीं भेट हि झाली नव्हती, या वर कोणाचा हि विश्वास बसणें शक्य नाहीं. या पुराव्या वरून शके १५९४ पूर्वी वासुदेवांचे गुरु समर्थ यांच्या विषयींची माहिती छत्रपतीस झाली असली पाहिजे व त्या उभयतांची गांठ हि झाली असली पाहिजे, असें च अनुमान काढणें प्राप्त आहे.

आतां येथपावेतों केलेल्या विवेचनाचा निष्कर्ष सारांशरूपानें शेवटीं दर्शवून हा बरा च लांबलेला परंतु अत्यंत महत्त्वाचा भाग आम्ही येथें पुरा करितों.

१ श्री समर्थ रामदास स्वामी आणि श्री छत्रपति शिवाजी महाराज यांचे महाराष्ट्राच्या उन्नतीच्या बाबतींतील ध्येय एक च स्वरूपाचें होतें. हें ध्येय दोघांच्या ठायीं स्वतंत्रपणें त्या काळच्या महाराष्ट्र देशाच्या परिस्थितीच्या योगानें उद्भूत झालें होतें.

२ क्षात्रधर्मास अनुसरून शिवाजी महाराजांनीं आपलें ध्येय साध्य होण्या करितां अपार संपत्ति मिळविली व पायदळ, घोडदळ, शस्त्रास्त्रें, डोंगरी किल्ले आणि भुईकोट किल्ले इत्यादि सामुग्रीच्या साह्यानें स्वधर्म स्थापनेच्या ध्येयाच्या सिध्यर्थ स्वराज्य स्थापनेचा खटाटोप केला.

३ ब्राह्मण धर्मास अनुसरून समर्थ रामदास स्वामींनीं ठिकठिकाणीं हनुमान देवतेची व चांफळ येथें श्रीरघुनाथाची स्थापना केली. श्रीहनुमान व श्रीरघुनाथ या देवतां विषयीं निःसीम भक्ति समर्थांनीं महाराष्ट्रीय जनतेच्या अंतःकरणांत उत्पन्न करून महाराष्ट्रांत छत्रपति हस्तें स्थापित होणाऱ्या रामराज्या विषयीं रामजन्मोत्सवाच्या द्वारें महाराष्ट्रीय जनतेचीं अंतःकरणें पूर्णपणें अनुकूल करून घेतलीं. या शिवाय स्मृत्यादि ग्रंथांतील ब्राह्मणवर्गाच्या व्यक्तीस विहित असलेले आचार पाळणारे अनेक ब्राह्मण शिष्य समर्थांनीं निर्माण केले. भरत खंडाच्या निरनिराळया प्रांतांत समर्थांनीं मठ निर्माण करून, त्यां वर श्रुतिस्मृति-प्रणीत आचार धर्माचें पालन करणारे अनेक शिष्य स्थापित केले व मुसलमानी राजवटींत बुडालेल्या वर्णाश्रमधर्माची आद्यशंकराचार्यां प्रमाणं पुनर्स्थापना केली. महाराष्ट्रांतील क्षत्रियवर्णांच्या लोकांस हि समर्थांनीं क्षात्रधर्माचा उपदेश करून त्यांच्यांत क्षात्रधर्म परिपालनाची वृत्ति निर्माण केली.

४ समर्थ गोदातटाक सोडून कृष्णातटाकीं शके १५६६ सालच्या सुमारास आले. थोडे दिवस महाबळेश्वर, वाई इत्यादि ठिकाणीं राहून नंतर ते शाहापूर, मसूर येथें वास्तव्य करण्यास आले. येथें आल्यावर ३ऱ्या कलमांत दर्शविलेला कार्यक्रम समर्थांनीं जारीनें अमलांत आणण्यास सुरवात केली. सुरवातीस च विजापूरच्या बादशहाच्या दरबारांतील द्यानतराव, बाजी घोरपडे, शहाजी राजे इत्यादि वजनदार हिंदु सरदारांच्या मार्फतीनें समर्थस्थापित देवस्थानांस इनाम जमिनी मिळाल्या गेल्या. चांफळ येथें श्रीरघुनाथाची स्थापना झाल्या नंतर स्वधर्मयुक्त स्वराज्य-स्थापनेस उपकारक अशा समर्थां कडून केल्या जाणाऱ्या रामजन्मोत्सवास, छत्रपति शिवाजी महाराज द्रव्याची मदत करूं लागले. " चढता वाढता देवाचा महोत्सव, चढतें वाढतें राज्य " या तत्कालीन वाक्प्रचारावरून ही गोष्ट सिद्ध होत आहे.

५ ज्या शाहापूर, मसूर इत्यादि ठिकाणाच्या आसपासच्या प्रदेशांत समर्थांनीं त्यांच्या ध्येयाच्या सिध्यर्थ वरील कलमांत नमूद केलेला कार्यक्रम अमलांत आणण्यास सुरवात केली, त्या च प्रदेशांत समर्थ येण्या पूर्वी कांहीं वर्षें अगोदर स्वराज्यस्थापनेच्या हेतूच्या सिध्यर्थ मसूर व कऱ्हाड या ठिकाणचीं देशमुखी वतनें हस्तगत करून, त्या प्रदेशा वर आपलें वर्चस्व स्थापित करण्याचें राजकारण शहाजी राजे व छत्रपति शिवाजी महाराज यांनीं चालविलें होतें. या राजकारणांत शहाजी राजांचा प्रमुख हस्तक कऱ्हाडचा रुद्राजी चंदो

देशपांडे हा होता. याची मुलगी अक्काबाई हिनें समर्थ त्या प्रदेशांत वास्तव्य करावयास येतांच त्यांचें शिष्यत्व पत्करिलें होतें. त्या च प्रमाणें रुद्राजी चंदो यानें हि समर्थांचें शिष्यत्व पत्करिलें होतें. समर्थ व रुद्राजी चंदो यांचा या प्रकारचा संबंध जुळून आल्या कारणानें समर्थांचें ध्येय व तत्सिध्यर्थ त्यांनीं त्या प्रदेशांत चालविलेल्या हालचाली यांची माहिती शिवाजी महाराजांस व शिवाजी महाराजांच्या ध्येयाची व हालचालींची माहिती समर्थ रामदास स्वामींस, रुद्राजी चंदो याच्या कडून विदित झाली असली पाहिजे या विषयीं संदेह राहात नाही.

६ समर्थ व छत्रपति शिवाजी महाराज या परस्परांस वरील कलमांत नमूद केल्या प्रमाणें परस्परांच्या ध्येयाची व हालचालींची माहितीं झाल्या वर, शिवाजी महाराजांस समर्थांच्या भेटीची हुरहुर लागून दासविश्रामधामांत वर्णिल्या प्रमाणें शके १५६७ सालांत समर्थांनीं पहिला रामजन्मोत्सव मसूर येथें केला; त्या प्रसंगीं शिवाजी महाराज समर्थांच्या भेटीस आले. सकृद्दर्शनीं दासविश्रामधामांत वर्णिलेला हा भेटीचा प्रसंग सत्य समजला पाहिजे. पांचव्या कलमांत नमूद केलेला पुरावा लक्षांत घेतां दासविश्रामधामां-तील भेटीच्या प्रसंगाच्या हकीकतीच्या सत्यतेस चांगली च बळकटी येत आहे.

७ शके १५९४ पूर्वीं समर्थांची व शिवाजी महाराजांची भेट च झाली नव्हती, असें मत प्रतिपादन करणारा पक्ष प्रतापगडच्या देवीच्या स्थापनेची हकीकत व वासुदेव महंतास मिळालेल्या इनाम जमिनीच्या समदेंतील उल्लेख यांच्या योगानें खोटा असल्याचें सिद्ध होत आहे.

या प्रमाणें आम्हीं केलेल्या चर्चेचा निष्कर्ष नमूद करून ही चर्चा आम्ही येथें पुरी करितों.



# परिशिष्ट

## समर्थ–प्रताप

समर्थप्रताप ग्रंथांत, छत्रपति शिवाजी महाराजा संबंधीं ज्या ज्या स्थळीं उल्लेख आले आहेत, ते खालीं दिले आहेत. समर्थप्रताप ग्रंथाचे कर्ते कोण व प्रामाण्याच्या दृष्टीनें या ग्रंथाची किंमत कोणत्या प्रकारची आहे, याचें या ठिकाणीं अल्प दिग्दर्शन करणें जरूर आहे. वेणाबाई या नांवाची समर्थांची एक शिष्यीण होती. तिची शिष्यीण बायाबाई व तिचे शिष्य समर्थप्रताप ग्रंथाचे कर्ते गिरिधर हे होत. समर्थ रामदास स्वामींच्या आज्ञेनें गिरिधरांनीं एकवार सज्जनगडा वर कीर्तन केले होतें. समर्थचरित्रांतील कांहीं प्रसंग आपण स्वतः पाहिल्याचें व कित्येक ऐकल्याचे समर्थप्रतापाच्या पहिल्या समासांत गिरिधरांनीं लिहिलें आहे. या वरून शके १६०३ मध्ये गिरिधरांचें वय पंचविसाच्या सुमारास असावें असें दिसते. अर्थात् त्यांचा जन्म शके १५७५ च्या सुमारास झाला असावा, असें मानण्यास हरकत नाहीं. गिरिधरांनीं अनेक ग्रंथ केले आहेत. ह्या विषयीं प्रस्तुत स्थळीं चर्चा करण्याचें कारण नाहीं. समर्थांनीं भरतखंडांत समर्थसांप्रदायांतर्गत प्रचंड घटना अस्तित्वांत आणून, ती चालविण्या करितां जे अनेक शिष्य लोक निर्माण केले त्यांचीं नांवें, त्यांनीं ज्या गांवीं व प्रांतीं मठ स्थापिले त्यांचीं नांवे, त्यांच्या ठिकाणचे विशिष्ट गुण या विषयींची अत्यंत तपशीलवार व विश्वसनीय माहिती प्रतापकारांनीं या ग्रंथांत दिली आहे. या एका बाबतींत या ग्रंथाची विश्वसनीयता पूर्णपणें प्रस्थापित झाल्या कारणाने, या ग्रंथांतील नमूद असलेली इतर हि माहिती विश्वसनीय असली पाहिजे असें सहजच अनुमान निघतें. या ग्रंथाचें स्वरूप या प्रकारचें असल्या कारणाने, प्रामाण्याच्या दृष्टीनें या ग्रथाचें महत्त्व मोठें च आहे. खालील उताऱ्यांत शिवाजी महाराजा संबंधाचे जे निरनिराळे उल्लेख आले आहेत, त्यांच्या सत्यासत्या विषयीं वाचकांनीं आपलें मत, या ग्रंथाच्या प्रामाण्या विषयीं आम्ही जे विचार व्यक्त केले आहेत ते लक्षांत घेऊन ठरवावे.

### समर्थप्रताप समास ३ रा

( पान २२ )

पराशर–पर्वतीं विचित्र वर्तलें । समर्थांसी शिवराजे भावें विनविलें ।
स्वामी प्रवर्षगिरिवरि येक रात्रीं राहिलें । पाहिजे आता गुरुदेवें ॥ ५० ॥

शिवराजा राजाब्रह्मरामआज्ञा आजि नाहीं । स्वामी राजाब्रह्मराम तुह्मी च मी पाही । हनुमानस्वामी तुम्ही लीलाविग्रह देही । अनुमान कांहीं असेचिना ॥ ५१ ॥ निकें म्हणोनि सोमतीर्थी केलें संध्या-वंदन । पुढें अमात्यसदनीं जालें कथानुकीर्तन । कथासमाप्तीं समर्थे केलें उड्डाण । पर्वतावरूनि स्वानंदें ॥ ५२ ॥ शिवगणासी परम विस्मय जालें । हनुमान स्वामी प्रत्यया आले । अष्ट प्रधान समाधान पावले । लाधलें निधान जगदोद्धारा ॥ ५३ ॥

## समर्थ प्रताप समास ३ रा

( पान २३।२४ )

शिवराजासी वृत्तांत कर्णोपकर्ण गेले । दर्शनासाठीं डोंगरोडोंगर लागले । समर्थदर्शन होय ना उदास जाले । राजकार्य कांहीं सुचेचिना ॥ ६४ ॥ शिवराजें शिवतरीं चमत्कार देखिले । करतळस्फोटक स्मरणें तात्काळ शमले । स्वप्नीं समर्थ प्रसाद देऊनि गेले । महानदी उतरूनियां ॥ ६५ ॥ कोण्ही राजदर्शनासी अनुष्ठानें करिती । समर्थपाईं राजराजेंद्र लागती । समर्थ केवळ अवतारमूर्ति । हनुमानरूपें सर्वेश्वरू ॥ ६६ ॥ हनुमान आपण समर्थपणें । तरि वैराग्यतप कासया कारणें । अहो लोकांत नाहींत जें जें आचरणें । तें तें करणें समर्था ॥ ६७ ॥ समर्थ हनुमान ऐक्यरूप निर्धारीं । जैशा सिंधूमध्यें द्वैतरूप लहरी । आपुलें आपण चराचरीं । खेळ खेळती स्वानंदें ॥ ६८ ॥ समर्थासी सर्वदां पर्वतीं राहाणें । शिवराजासी सदां पर्वत दुर्ग बांधणें । समर्थ दर्शनें माळा छत्र पावणें । छत्रपति होणें स्वामीप्रतापें ॥ ६९ ॥ दीर्घदंड नमस्कार घालूनि । चरणपादुका मस्तकीं धरूनि । राज्य पावला क्षत्रिय दाक्षणी । द्विजराज्य दिधलें समर्थे ॥ ७० ॥ समर्थे शिवराजाचा कराराभाव पाहिला । शिवें वर्जिला तो तांबुल दिधला । शिवगणें हनुमानरूपें प्रसाद घेतला । मुखांत घातला अविलंबें ॥ ७१ ॥ पुढें करनाटक हस्तगत केलें । समर्थ ध्यान तेथें आठविलें । अभि-जितीं येळरीं दर्शन दिधलें । कृष्णातीरीं तेव्हां समर्थ ॥ ७२ ॥

## समर्थ प्रताप समास ३ रा

( पान २५ )

समर्थ येकदां कौळिकवचनें गुहांतरीं प्रवेशले । हस्तकडगें देऊनि कौळिगमार्गे फिरविले । शिवराजें कौळिक भांड्यामुखीं बांधविले । समर्थ धांवण्या धांविले अश्ना दिवसें ॥ ७८ ॥ अश्ना दिवस समर्थ गुहांतरीं फिरले । परम भाग्यें पुन्हा देखिले । समर्थाविणें लोक आंधळे होते जाले । संसार-

तमामाझारी ॥ ७९ ॥ आनंद जाला कृष्णा तीरीं । घोष दाटला जयजयकारीं । समाचार गेले रायेरी । शिवराज दाटला स्वानंदे ॥ ८० ॥ मग समर्थें अवतार-भूमीचें अवलोकन केलें । श्रीराणाबाई मातेसी दर्शन दिधलें । श्रेष्ठांसी समर्थें नमस्कारिलें । कीतियेक दिवसां पातले कृष्णातीरा ॥ ८१ ॥ एवं समर्थप्रताप वर्तमान । वेणीगिरिधरें केले निवेदन । पुढें श्रीरामसमर्थसंस्थापन । समर्थ चांफळीं करिताती ॥ ८२ ॥

## समर्थ प्रताप समास ७ वा

### ( पान ३८।३९ )

कर्म केलें उपासनापर । उपासना केवळ ज्ञानपर ! ज्ञानविज्ञान परब्रह्म-पर । सद्गुरुसमर्थप्रतापें ॥ ६ ॥ समर्थें गागाभट्टासी दर्शनें दिधलीं । तीन वर्षे दर्शनप्रतीक्षा श्रवणीं ऐकिली । शिवराजपूजेचीं अक्रा सहस्र होनें उडविलीं । सुवर्णवृष्टि केली ब्राह्मणावरी ॥ ७ ॥ शिवराजासी आनंद जाले । रायगडीं मोठे उछाह केले । नाना दारुयंत्रें घोष गडोगड गेले । प्रतापगडा आले समर्थ ॥ ८ ॥ श्रीतुळजादेवीसी नवसफूल वाइलें । देवीनें कंठमौक्तिकी श्रवण-भूषण दिधलें । समर्थें भिकार आणून राजअंबार लुटविलें । भिक्षा कौतुक केले सिबिकारूढ ॥ ९ ॥ शिवराजें समर्थासी बरें जाटिलें । हनुमानपुछ कटितटीं लपेटिलें देखिलें । समर्थें सामर्थ्यस्वरूप प्रगटिलें । लोकानुग्रहाकारणें ॥ १० ॥ शिवराजें तुरे पदकें मुक्तमाळा । अमोल्य मंदिलें अमोल्य मेखळा । इजारा पैजारा मुक्तलग सकळा । मंचक सेज शय्या समर्पिल्या ॥ ११ ॥ लोकीं वैभवभजनें उदंड केली । समर्थें देवब्राह्मणकार्यासी लाविलीं ।

## समर्थ प्रताप

### ( समास ८ पान ४४-४५ )

शिवराजासी अक्रा मुष्टि भिक्षा मागों धाडिली । शिवराज म्हणे माझी परीक्षा समर्थें मांडिली । आकराआकरीं खंड्या कोठी पाठविली । हनुमानस्वामि-मुष्टि लक्षूनियां ॥ आकरा खंड्यांची किंचित येक मुष्टि । आकरा आकरीं धाडिली कोठी । समर्थआज्ञा राजा मानी मोठी । शिवराज तेणें बळावला ॥४॥ समर्थांचे उत्तमोत्तम भक्ति छंद । छंद बैसले परमार्थबंद । लीलाविग्रही स्वानंद-कंद । सच्चिदानंद जगद्गुरु ॥ ५ ॥ गुरुदेवदर्शनीं तस्कर विरक्त जाले । तस्कर विद्या टाकूनि ब्रह्मविद्येवरी आले । समर्थांपुढें माल आणून रिचविले । समर्थें वाटिले ब्राह्मणा ॥ ६ ॥ घोर अरण्यीं समर्थ बैसले । इच्छेचा दाता देव ऐसें

बोलिले । कोण्हीयेक मूर्खे तेथें आक्षेप केले। येथें घृत केळें देव देईल किं ॥७॥ जंव पाव घडी येक लोटली । तव घृत केळीं कोल्हापुरप्रांतींचीं आलीं। स्वइच्छा अभाविकांसी वाढलीं । मूर्खा कोण्या सेवे देवासी कष्टविलें ॥ ८ ॥ समर्थभोजनीं जटिळ आले । गडोगडीचे सामें राज-अंबारीचे उतरिले। आकरा सह्स्र जटिळ दों प्रहरांत जेऊं घातले । आपण सध्यान्न जेविले पूर्वे॰ पात्रीं । शिवराजासी समर्थव्रत कळलें । निस्पृह स्वामीचें जटिळें सत्व पाहिलें । विवेकेंचि शिवराजे समर्थासी विनविलें । सैह्याद्रिशिखरीं राहावें गुरुदेवें ॥ पूर्वि ऋषींचें आहे गुप्त स्थान । येथें समर्थ करावें अधिष्ठान । जेथें श्रीचरण लागती परिपूर्ण । तेथें पुण्यपावन भूमंडळ ॥ ११ ॥ सहस्रांकित सदन संकल्प केला । समर्थसदनासी प्रारंभ झाला । शिवराजा आज्ञा घेऊनि निघाला। सप्तऋषिदुर्गीहूनि आला येक मासे ॥ सज्जनगडीं समर्थआश्रम किंचित पर्जन्यीं गळाला । शिवराजें दुर्गाधिपत्यासी पर्वतपात आरंभिला । समर्थ सेवेसी सेवक मागोनि घेतला । स्वामी क्षमासिंधु दीनबंधु ॥ १३ ॥ शिवराजसेवा पंचाविंशति नित्य भोजन । समर्थसदनीं अन्नब्रह्मनिवेदन । गमनागमनीं दुर्ग-द्वारीं निर्बंधन । लक्षानुलक्ष यात्रेसी ॥ १४ ॥

## समर्थ प्रताप समास ८ वा

( पान ४६।४७ )

समर्थांचें विचित्र करणें । श्रीराम मर्यादा पाळणें । राजप्रधानेंसीं रात्रीं उभें ठाकणे । श्रीरामकथा संपली सूर्योदयीं ॥ २७ ॥ ऐका शिवरायें कोणियेक दिवसीं धाडिलें विनतिपत्र । आणविलें समर्थमंचकसूत्र । येकाकी मंचक समर्थे शैय्याविला पवित्र । राजा ऐकोन संतोषला ॥ २८ ॥ राजा मंचक शैय्या घेऊनि दर्शनासी आला । राजद्वारीं समाचार जाणविला । पारपत्ये ह्मणती जी संतोष द्यावया राजयाला । उत्तम वस्त्रे भूषणें धरावीं ॥ २९ ॥ समर्थ उत्तम हुमुजी भगवा साज केला । समर्थ दर्शनासी शिवराज आला । साष्टांग नमस्कार मुहुर्तेक घातला । उठोनि मुहूर्तेक अवलोकिले समर्थ ॥३०॥ संत महंत निवांत सभेसी देखिले । सिद्ध साधक पुण्यश्लोक भले । निस्पृह ग्रंथलेखक देखता नृपें माथे डोलविले । देवसभा जेथें कुरवंडिली ॥ ३१ ॥ शिवराजा ह्मणे माझें परम भाग्यसाम्राज्य । स्वराज्यीं केवळ राजा ब्रह्म रामराज्य । अनंत जीवगण शिवगण पावले सायोज्य । स्वर्गस्थ देवगण उद्धरिले ॥ ३२ ॥ समर्थे निस्पृह सर्व हि केलें । देवें आश्रम कांहीं चालवावे

भले । शिवराजा आश्रमधर्म आम्ही लौकिकीं चालविले । माझे शिष्य संतान सृष्टिवरी ॥ ३३ ॥ प्रसाद अतिथ्य पावोनि राजा गेला । पुनर्दर्शन म्हणोनि हेतु पाई ठेविला । पुढें समर्थ अधिष्ठानासी सकळ प्रांत लोटला । श्रीगुरुदेव-दर्शना ॥ ३४ ॥

## समर्थप्रताप समास ९ वा

( पान ५६ )

शिवराज वासुदेव महंतासी पाही । अति दर्शनलाललांसी श्रेष्ठासी वियोग नाहीं । येन्हवीं कोण्हासी हि समर्थ वियोग न सोसवे कांहीं । ध्यानीं मनीं चिंतनीं सर्वदा ॥ ५५ ॥

## समर्थप्रताप समास १८ वा

( पान १११ )

समर्थांच्या निस्पृहांसी यवन छळक । नागटाणीं भिक्षाटणीं छळी देख । समर्थ ऐकोनि वनीं पळती निशंक । मागें हनुमान जाळिती यवनगृहें ॥ समर्थें आकारपूर्वक यवनासी मारविलें । मग चांफळक्षेत्र उभें केलें । श्रीतुळजा माउलीसी संस्थापिलें । जाउलीं पर्वतीं प्रतापगडीं ॥ ३६ ॥ समर्थआज्ञा चांफळी प्रभावें । मोहछाहीं सगुणप्रतापकीर्तन करावें । संतसज्जन निर्गुणरूप स्वभावें । आत्माराम निरंजन जनीं ॥ ३७ ॥

## समर्थप्रताप समास २० वा

( पान १२५ )

कैलासवासी शिवगणनाम्नें । क्षत्रियकुळावतंसें सप्रेमें । मंत्रियानुमतें सेवेसी संभ्रमें । रुद्रसंख्या ग्रामें समर्पिलीं ॥ ४ ॥ जव जव शिवराज्यवर्धमानें । तव तव रामभजनासी ग्राम-प्रदानें । राजा ब्रह्म राम अनुसंधानें । राजश्रिया विराजत ॥ ५ ॥

## समर्थप्रताप समास २० वा

( पान १३२ )

समर्थ भविष्य न सांगोनि सांगती । दक्षिणेसी युद्धें दुर्धर दिसती अकरा अकरीं तरवारा मागों धाडिती । शिवराजयासी सत्वर ॥६१॥ शिवराजें चिन्ह जाणितलें । दक्षणेसी परचक्र सत्य आलें । समर्थें सर्व पराभविलें स्वयें निजशस्त्रें घेउनियां ॥ ६२ ॥ पुढें समर्थ शिवराजयासी लग्न कर

म्हणती । शिवराज आपुला कैलासमार्ग लक्षिती । समर्थासी वंदूनि रायगडासी जाती । कैलासवास करावया ॥ ६ ॥ समर्थ स्वप्रकाशें आंधारीं तीन मास बैसताती । मुरूमपात्रें उदकें सेविताती ।



## दासविश्रामधाम ग्रंथांतील
# शिवछत्रपतीविषयक उतारे

ह्या ग्रंथाच्या दुसऱ्या भागांत समर्थशिवाजीसंबंधा विषयीं आम्हीं जें विवेचन केलें आहे, त्याला दासविश्रामधामांत वर्णिलेला एक प्रसंग आधारभूत घेतला आहे. ह्या प्रसंगा खेरीज समर्थाशिवाजीसंबंधविषयक दुसरे अनेक प्रसंग ह्या ग्रंथांत वर्णिले आहेत; त्यां पैकीं कांहीं महत्त्वाच्या प्रसंगा विषयींचे उतारे आम्हीं खालीं दिले आहेत. या उल्लेखांतील प्रसंग कितपत विश्वसनीय मानावयाचे, हें या ग्रंथाच्या प्रामाण्या वर अवलंबून आहे. या ग्रंथाची किंमत प्रामाण्याच्या दृष्टीनें ठरविण्या करितां ह्या ग्रंथाचा कर्ता कोण, तो कोणत्या परंपरे पैकीं व त्यानें वर्णिलेल्या प्रसंगाच्या माहितीचा उगम कोणत्या स्वरूपाचा आहे ह्या गोष्टींचा विचार केला पाहिजे. या मुद्या संबंधीं जरूर तितकी माहिती आम्ही येथें नमूद करितों. समर्थांच्या या चरित्रग्रंथास, रामदासी वाङ्मयाचे सुप्रसिद्ध संशोधक आमचे मित्र रा. शंकर श्रीकृष्ण देव यांनीं रामदासी सांप्रदायाचा विश्वकोश असें नांव दिलें आहे. ग्रथाचा विस्तार लक्षांत घेतां हें वर्णन अगदीं यथार्थ आहे. सुपररॉयल अष्टप.नी आकाराचे ह्या ग्रंथाचे चार खंड असून एकंदर पृष्ठ संख्या९७४आहे.या ग्रंथाचे कर्ते आरंभापासोने शेवटवरी । सद्गुरुचर्या जे नानापरी । नाना अनुवादु उपासना सारी । कल्याण महाराजा ठाऊक ॥ या प्रमाणें ज्यांचें वर्णन करण्यांत आलें आहे, अशा डोमगांवमठाधिपति कल्याण स्वामींच्या परंपरे पैकीं होत. म्हणजे समर्थांच्या चरित्राची खडान् खडा ज्यांस माहिती आहे, अशा परंपरे पैकीं या ग्रंथाचे कर्ते होते हें उघड आहे.दासविश्रामधाम ग्रंथाच्या प्रमाण्याच्या दृष्टीनें हा महत्त्वाचा मुद्दा लक्षांत ठेवणें जरूर आहे.या कल्याणांचे शिष्य आपचंदमठाधिपति शिवराम व तडवळे मठाधिपति जगन्नाथ हे होत. समर्थांच्या चरित्रांतील निरनिराळ्या प्रसंगाची हकीकत या दोघा शिष्यांस सांगावी असा कल्याणांचा परिपाठ होता. आपचंदमठाधिपति शिवराम

स्वामींचे शिष्य रामचंद्र व त्यांचे शिष्य दासविश्रामधामाचे कर्ते आत्माराम हे होत. ही परंपरा लक्षांत घेतां शिवराम स्वामीपासून रामचंद्रास व त्यांच्या पासून दासविश्रामधामकर्ते आत्माराम यांस समर्थ-चरित्राची माहिती प्राप्त झाली असली पाहिजे हें उघड आहे. ही गोष्ट लक्षांत घेतां दास-विश्रामधामांत समर्थशिवाजीसंबंधा विषयीं नमूद केलेल्या माहितीचा उगम निःसं-शय विश्वसनीय आहे या विषयीं शंका घेण्यास जागा नाहीं. आतां दासविश्रामधाम-कर्ते आत्माराम स्वामी यांचा काळ कोणता व त्यांनीं या ग्रंथाची रचना कधीं केली या संबंधाची माहिती या ठिकाणीं नमूद करणें जरूर आहे. या ग्रंथाचें लेखन कोणत्या शकांत समाप्त झालें हें नमूद नाहीं; परंतु ग्रंथाच्या शेवटच्या भागांत दोन ठिकाणीं काळाचा निर्देश करण्यांत आला आहे; त्या वरून या ग्रंथाचा रचनाकाल अंदाजानें ठरवितां येतो.दासविश्रामधामाचे कर्ते आत्माराम यांनी त्यांचे गुरु रामचंद्रबावा यांचें चरित्र वर्णन केलें आहे. त्या पैकीं ( पान ९७० ) खालील उल्लेख महत्त्वाचा आहे.

केलें हो बहुपरी संरक्षण । येकदां दुखण्यानें येतां मरण । स्वप्नीं कथिलें कीं आयुष्य नूतन । देऊन रक्षिन भीऊं नको ॥ ५३ ॥ येकदां सर्पाचें जालें दंशण । स्मरत गुरुदेवा केलों शयन । कांहीं न बाधितां जालें शमन । हा ग्रंथ ल्याहवया आज्ञापिलें ॥ ५४ ॥ गुरुआज्ञे बरव मी करिता व्यापार । संस्थाहुनि पडलों दूर । पुण्यतिथीचा राहिला विचार । मठांतरीं बखेडा यास्तव ॥ ५५ ॥ मिळोन येकदां वैदीक लोक । हिणावितां मनीं जालों साशंक । प्रगटोन स्वप्नीं दयाळ देशिक । पुण्य दिवस नेमून दीधले ॥ ५६ ॥ चैत्री पौर्णिमा दिवस उत्तम । ज्या दिनीं जालासे मारुतीजन्म । नेमून तिथी ते चालतां नेम । भूसुरीं देखो न सकती ॥ तों ईकडे संस्थानि अकस्मात । चैत्र उत्छवी उरलें साहित्य । खर्चोन संपादिले विधानात । तो चि पुण्य दिवस नेमिला । संतोष वाटला सकळिकासी । काय आवडलें कीं गुरुरायासी । बोला-ऊन घेतलें संस्थानासी । सेवा कराया इहपर ॥ सन्न अक्रासे सत्याऐसी फसली । विळंब संवछरीं फुरसती जाली । गैबपीर होठेले काननस्थळीं । रामचंद्रबावा उदासी ॥ विदित न करीती ते गुप्तस्थान । कां परमार्थकार्या टाकून मी दीन । येईन कठीण जागीं सीणेन । यास्तव अपचंदीं थोकाविलें ॥ गुप्तांतीं त्रयतप लोटल्यावरी । परमार्थ खगला बहुत मठांतरीं । यास्तव मज दीना धरून करीं । कार्य स्वसत्ते सपादिती ॥ येकदां साहित्य न जालें करितां ।

तळमळीत पडलों बाघोन चिंता । देवद्वार झाडिलें स्वप्नीं दाता । त्या उल्हासीं उद्भवलें वाक्य ऐका ॥ १६३ ॥ पडो न देती किमपी सांकडें । कळोन हि आज्ञा नाहीं दृढ । बरळलों स्वछंदें तें वचन गोड । मानोन संता हो सांभाळा । सन्न बारासे हे पंचवीस फसली । धात संवछरीं संस्थानस्थळीं । चैत्र उछावा सामुग्री जाली । झोळी आधारें ससांग ॥ दीधला मंडपु दीपु ठेविला । चहुंपरी यात्रेचा मेळा मिळाला । तों चौंकडोन गलबला फार चि जाला । न साबरिती कोणी कोणासी ॥ बेदडे छुटोर कर्ते मरण । धुंद करित आले त्याच वाटेन । कांहीं च न सुचे अशक्तपणानें । समाधी जवळी पडियलों ॥ पाहतों तंव तेथें समाधी नाहीं । बहुत चि घाबरलों तेणें हृदईं । स्वप्नवत कथिलें तै मी लवलाही । गेले रे कटक फिरवावया ॥ लस्कर अडवाटे फिरलें जेव्हां । हो तीच समाधी दिसली तेव्हां । कांहीं च न पाडितां गुंता गोवा । उत्छाव करून घेतलें ॥ ६९ ॥

वर दिलेल्या उताऱ्या वरून दासविश्रामधाम ग्रंथाच्या रचनेस आत्माराम स्वामींनीं शके १७०० इ. स. १७७८ पूर्वी केव्हां तरी सुरवात करून तो ग्रंथ शके १७३८ इ. स. १८१६ नंतर केव्हां तरी समाप्त केला असें दिसतें.

## विसावा २४

### ( पान १८१ ते १८५ )

असो शिवाजीनृप पुण्यसीळ । दळभारमेळा मिळाला पुष्कळ । सेवकादि पंडित मागते दुर्बळ । ते सर्वा तोषवी अधिकारें ॥ ६० ॥ परि संपदापाठीं विस्मृति जडे । बहुत द्रव्यासीं विश्वास मोडे । विषय-अध्यासीं विसर पडे । रजतमगुणवश्य राजा कीं ॥ जैसा सुग्रीवा विषयजोजारें । श्रीरामजींचा पडिला विसर । मग सौमित्राचें ऐकोनि उत्तर । तरला सावध होऊनि ॥ कीं जैत-पाळांनीं पुराणश्रवण । करितां ऐकोनि गुरुमहिमान । पीडोनि बहुतेका जाला पावन । श्रीमुकुंदराजगुरुकृपें ॥ तेवि शिवाजी नृपनंदन । करितां स्वभावीं पुराणश्रवण । आदळतां कानीं गुरुवर्मखूण । अनुताप उद्भवला अंतरीं ॥ तरीच करावें श्रवण ग्रंथ । हृदईं बिंबावा त्यांतील अर्थ । रहस्य निघालें सांगू किंचित । ऐकोनि मानसीं दृढ धरा ॥ ६५ ॥ भागवतींचें गुरुमहिमान । रामायणींचें गुरुभक्तकथन । ससांग सेवा पूजाविधान । ऐकोनि राजा प्रस्तावला ॥ ह्मणे धिग्जन्म भ्रष्टलों मूर्ख । गुरुसेवेशी जालों विन्मुख । या वैभवानें पाडिलें ठक । पाहूं गुरुदेवा कोणे स्थळीं ॥ तपोनि तपातें गुरुकृपा लाहती । गुरु गुरु

म्हणोनि साधीत फिरती । लावितां कसोटी धैर्य न ढळती । मी मंदमती भुललों ।। न्याय अन्याय न कळे मजला । दुष्कृताचा बनलों हृद्रोग पुतळा । हृद्रोग सांगू जरि आपुला । योग्यता कोणी न दिसती ।। आपणामाजीं आपण पोळे । हळाहळ तुल्य । त्यागचि हों पाहे भक्तिबळें । जाला प्रवर्तक विचारीं ।। प्रसन्न होईल गुरुमाउली । तंव पाहिजे कांहीं सेवा केली । तरी श्रीसंपदादि आहे जितुली । रक्षोनि कीजे अर्पण ।। भावोनि यापरि शिकारीमिसें । वनोवनीं हिंडों लागला उदास । आप्तवर्गादि मानस्थ-पुरुष । करिती कुडकुड मार्गे चि । गुरूस हुडकी जैसा यदुराव । कीं क्रौंचराजया उठिला भाव । तैसा शिवाजी न गणोनि वैभव । व्यसन धरिलासे व्याहळीचा ।। अहो गुरु व्हावा म्हणेल कोणी । पुरवील आर्त श्री शूळपाणी । कीं वांछील गुरु पाहूं दृढता करूनि । पुरेल त्रिसत्य मनोरथु ।। मायीक मैंद ते कोण्या हिशोबीं । सीमा न पावती सिंतरं लोभी । वास कराया निरावलंबीं । जडाभिमानी अयोग्य ।। असो शिवाजीभाव निर्मळ । असती ज्या वनीं श्रीगुरुदयाळ । तिकडे चि त्याचें येणें घडलें । देखिलें नवल तये स्थळीं ।। रामदासजींचे सहवासी पशू । वृक रीस मृगें मृगेशु । येके ठायीं करूनि सहवासु । करिती उल्हासु निर्वैर ।। पाराशरमुनि जेवि पशुमेळीं । गोगोपवत्सामाजीं वनमाळी । भयंकर वनीं शोभला शूळी । तैसे समर्थ विराजले ।। फासे गोळी कीं दगड तीर । प्रेरितां क्षोभेल योगी अंतर । म्हणोनि ठेले पाहत चि दूर । जवळीं न येववे भयास्तव ।। आधींच भ्रांतला तृषा लागली । उठोनि पातला तीराजवळी । तव देखिलीं पानें तिरती जळीं । ते सेवकाकरीं काढवी ।। कारकुन आले तेथें धाऊनि । जे जाणते विवेकी कर्ते मनधरणी । राजाज्ञा ते सिरीं वंदूनि । अभंगादि वाचिती प्राजळ ।। ऐकिले शतकादि भक्तीं अभंग । पदश्लोकादि वचन बहु सांग । वाचितां वाचितां मिष्ट चि लागे । गाती जगांत ऐकतां कीं ।। कवन चिन्ह कविवाक्य प्रशांश । अष्टाक्षरी श्लोकामाजी रहस्य । बोलिले आहेति श्रीरामदास । ऐकोनि अर्थाची घ्या गोडी ।। भक्तिज्ञानवैराग्ययुक्त । नीतिन्यायतत्वें शास्त्रसंमत । ऐकोनि अर्थ तो स्वयें नृपसुत । डोलवून मस्तक सुखावला ।। दास रामदास मुद्रा-नाम । कळे रहणी ते भागवतधर्म । यथावरोनि संतोष परम । वाटला स्वगुरु म्हणोनियां ।। जवळीं न जाववे भयास्तव । लिखितपर्णं ते घेऊनि आघवें । स्वधामासी पातला राव । सहसमुदावसहितेसीं ।। लेखिकाहातीं श्रद्धापूर्वक । उतार करविले कवन अस्क । त्रयदिवसवरि ऐसें चि हरिखें । पर्ण अवग्र लिहिविले ।। समर्थ करानें स्पर्शिलें पर्ण । गळ्यास बांधितां यंत्र करून । भूतबाधादि रोग दारुण ।

तत्काळ शमन होतसे ॥ समंध सुटती देतां धूर । अथवा धुऊनि पाजितां नीर । मूढमती ते होती चतुर । पूजिल्या होते जयप्रद ॥ असो सैन्यका वदे नृपाळ । नसे शिकारी व्यसन अलुमाळ । गुरु माउलीचें धरिजे पाउलें । तरी सडे सवारी चालवीं । चालिले जैसी जाली आज्ञा । लगबगा येऊनि पातले वना । येकीकडे थोपवूनि सैन्या । तिष्ठला रावो येकीकडे ॥ जगन्मातेचा वर-प्रभाव । मार्गे पर्वतीं चर्या अपूर्व । देखिली ते होऊनि आठव । तळमळीं पेंध्यापरीनें ॥ कीं नानकबाबा रिघतां वनीं । आक्रंदले शिष्य सद्गुणी । कीं गुहका आठवे चापपाणी । व्याधा अगत्य हरीचें ॥ जंव पाहे गुरुदेवा नेहरा देऊन । तंव देखिलें भाळींचे अबालुचिन्ह । कोण दास कीं संकल्पानिरशन । होऊनि निश्चित निर्मळला ॥ आणखी पाहतां उचलोनि वदन । भासे समर्थ वायुनंदन । मागुती लक्षितां हरि आणि सज्जन । बोलती क्षणेका येकले ॥ मग सावधपणें धीटला राव । ह्मणे वागती जे जे गुरुसर्वे । ते ते गुरुबंधु भावोनि भावें । चमकला त्वरें गुरुकडे ॥ सद्गदित जालासे कंठ । जोडोनि दोनी करसंपुट । भुईस पडलें हातींचें काष्ट । तेवि दंडवत घातला ॥ उठोनि मागुती स्तऊं स्मरेना । कृपा उपजली सद्गुरुराणा । वदले उठीं पां मनकामना । पूर्ण करील रघुपति ॥ ऐकानि यापरि अभय वर । कांपत सन्मुखा ठाकला नृपवर । प्रेमाश्रूनें भरले नेत्र । कांहीं च न स्मरे मागे पुढे ॥ म्हणे दयाळा सद्गुरुरामा । मी अन्याई टेकूनि कामा । विभवभ्रमानें विसरलों तुम्हा । क्षमोनि कीजे जी सनाथ ॥ हांसोनि वदले समर्थयोगी । जाई स्वधामा सर्वदा भोगीं ॥ सांगूं कारण येक तुजलागीं । सार सर्वस्वीं विश्वास ॥ आतां होऊं नको उदास । घरीं मानसीं दृढविश्वास । जाणजाणोनि स्वहितसारांश । जा करीं राज्य सिणों नको ॥ नृप वदे देवा पुरे संसार । तनुमनधनादि राज्य समग्र । स्वामींचें हे मी दीन किंकर । पादुकाधर सेवेचा ॥ स्वामी बैसावें सिंहासनीं । मी पुढें राहीन जोडोनि पाणी । तंव हांसोन वदले मोक्षदानी । आज्ञा प्रमाण तुला कीं ॥ जी जी त्रिमान्य हे गुरुवर्या । तरि विकल्प-मांडणी कासया । आठऊनि प्रेमें श्रीरघुराया । सर्वसौख्यातें पाविजे ॥ कृपा करूनि आम्हा रघुराज । ब्रह्मादिका जें नलभे निज । ते स्वानंदभुवनींचें पदसामराज्य । अखंड दिधलेंसे ऐकत्वें ॥ तरि जी कृपाळा राज्यसंपदा । चाड नसे चि न वांछी कदां । समागमेंसी राहीन सदां । करीन शुश्रुषा काननीं ॥ जेवि श्रीरामा वसिष्ठमुनि । नियमिला आज्ञा प्रमाण म्हणुनी । तेवि दासांनीं प्रबोध करूनि । वसुआज्ञातें नेमिलें ॥ ज्यां ये येथ करूनि आज्ञा । धाडिलें

राजया स्वस्थ स्वस्थाना । तो अध्यार्शी पातला कानना । दुसरे दिनीं उदास ॥ १८७३ ॥ तों वसंतमाझीं खडतर ऊष्ण । द्वादश घटिका जाला दिन । नेमादिक सारूनि सज्जनें । पानगे सिद्ध केलेसे ॥ सांगीकसमुदाया ठेऊनि दूर । पातला येकांकीं तेथें नृपवर । घालोनि साष्टांग नमस्कार । जोडोनि हस्त उभेला ॥ केलें कृपेनें अवलोकन । श्रमें उतरलें देखोनि वदन । म्हणातिलें येई स्नान करोन । संतोष तेणें राजया ॥ दरिद्रिया धन सांपडलें । कीं गरिबाचें सेत पिकलें । सद्ब्राह्मणा साहित्य जालें । लग्न यज्ञ मुंजी कराया ॥ जाणता प्रभु तो गुणयुक्तिवान । येक धोत्राचे करूनि दोन । स्न नांतीं नेसला अर्धवसन । उपवस्त्र अर्ध पांघुरला ॥ वोरखडा घासूनि सम्यक । भाळीं रेखिला वैष्णवी तिलक । सकळ हि साधनीं सार मुसौख्य । गुरुध्यान करित पातला ॥ डोण्यांत द्रोणामाजील जळें । धुऊनि सद्गुरुपादकमळ । वाहूनि सद्भावें तुळसीदळ । प्रमाण केले एकादश । श्रीगुरुआज्ञा सर्वांस वंद्य । धन्य नृपाचें पुण्य अगाध । सेऊनि सुतीर्थी शेप-प्रसाद । पावीन घाला सर्वस्वें ॥ सहज सद्गुरू केलें शयन । शिष्य तो बैसला चुरित चरण । परमार्थाचे रहस्य गहन । सांगोनि केलें बहु सुखी ॥ ससांग घडला आत्मोपदेश । समाधानी जाला स्वरूपीं समरस । तंव अस्तमाना चालिला दिनेश । आतां जा वदले ठिकाणा ॥ तंव राजयानीं विनंति केली । राहेन सर्वदा चरणाजवळी । अरे तैसें चि घडेल स्वल्पकाळीं । धीर बहुत चि असावें ॥ नेणो प्रबोध मूर्तिमंत । विसावा घेतला नृप-हृदयांत । कथिलें तत्समई साधन मात । येक दोन स्वस्थ अवधारा ॥ आणीक वदले अभंग-श्लोक । श्रवण करा हो स्वहितासि हरिखें । खुणेसी पावला धरणीपाळक अलिसदृशा ते बिंबली ॥ नित्य दर्शना येईल पुढें । जाणती सेवा करील दृढ । प्रसंगोचिती वचन रोकडें । बोलिलें तें ऐकाल ॥ जंव स्वस्थाना चालिला भूपति । भीत भीत तैं केली विनंती । आज्ञा द्यावी जी अनाथाप्रती । उदईक येथें यावया ॥ वदतां तथास्तु गेला भूप । रात्रौ न लागे अणुमात्र झोंप । उदयासी न येतां यमराजबाप । सद्गुरु जवळी पातला ॥ अभ्यंग स्नानादि राजोपचार । पीतांबरादि अळंकार । सहित विध्युक्ति स्वयें नृपवर । पूजी मनेच्छापूर्वक ॥ धन्य जनीं या त्याचें दैव । जया प्रसन्न श्रीगुरुराव ॥ लाहूनियां कृपा वैभव । मानोनि आज्ञा परतला ॥ २५ ॥ येऊनि शोभला सिंहासनी । राज्यभार चालवी जाणजाणोनी । परि विसांवा घेतसे येकांतस्थानीं । गुरुकथित ग्रंथीं मनन करित ॥ समागमें जे वागले हुजरे ।

धाडितां तयांनीं आणिली खबर । नसती ते वनीं दाता गुरुवर । भूषणादिकें पडलीं असे ॥ ते आणवोनि पूजितु राव । इकडे समर्थ महानुभव । आणिके वनीं वसोनि सद्भावें । आळविती श्रीरामा ॥ चित्त द्यावें पुढील कथनीं । निघती फिराया मोक्षदानी । इकडे शिवाजी जडला भजनीं । परि लोकांसी वाटे विपरीत ॥ परमार्थ सौख्य लाधलें भाविका । देखों न सकवे त्रिविध लोका । हंस ऐश्वर्य न साहवे काका । भल्यासी बोका डिऊं पाहे ॥ जरि आला सन्मुखी उच्चैःश्रव । लाता हाणूं पाहे गाढव । द्विरदारूढाचें देखानि वैभव । भुंके रोडका सुणक जेवि ॥ तेवि सुहृदें कारकून याचक । पंडित शास्त्री पुराणीक ॥ म्हणती बहुपोषा दैवीं देख । पिसाट होणें होतें कीं ॥ फकीर गोसावी नेणवे कोण । राजया घातलें त्यांनीं मोहन । अरे हो जना पशु करोन । भौंवतीं हिंडों लाविलें ॥ टाणाटोणे तो जाणे बहुत । शिक्षूं जातां करील अनर्थ । कोणी धिःकारी कां जल्पता व्यर्थ । होणार कांहीं सुटेना ॥ दाटोनि पाठीं लागतां देख । करूनि टाकितो आपणा सारिखें । भलतें विकल्पें न बोला वाक्य । दूरद राज होईल ॥ जाणोनि प्रभूचा भारी दर्प । बोलों सामोरीं सुटतो कांप । मागें चि करिती नाना जल्प । कळतां हि नृप स्वग-मगीना ॥ क्षोभोनि गागा पंडित मनीं । मऱ्हाटभाषा निंदनिंदोनि । पांडित्य-कळा दावदावोनि । म्हणे नृपाळा छंद सोडीं ॥ म्हणोनि बोलतों आम्ही हिताचें । कां पालवीं पडला दरिद्रियाचे । परामृष करावा विहित तुमचें । सन्निधीं आलेया कोणीहि ॥ जे जे पुसाल ज्ञानगोष्टी । श्रुतिसंमतीनें घालूं दृष्टीं । अथवा आर्त जें असेल पोटीं । सांगा तपोनि पुरऊं ते ॥ गुरु मानिला हो पत्तेविण । थोर सभ्यस्था लागलें लांछन । स्वयमेव शाहाणे आहां निपुण । द्या मान पूर्वज चालीसी ॥ बहुत चि बोलिला कटावगरीनें । तो नेदीच राजा प्रतिभाषण । अहो गुरुपुत्रा हें चि भूषण । सहनता शांति राखावी ॥ यद्यपि रावो दे प्रतिवचन । जाणते तुम्ही आहां सर्वज्ञ । उभयतां घडेल स्वहित जेणें । तें निजनिधान बोलावें ॥ ४२ ॥ ममापराधु घाला पोटीं । मी तूं विण स्थानीं द्यावी दृष्टि । सर्वानंदें भरो सृष्टि । न माने गोष्टी हे पंडिता ॥ बहु दिवसवरि बोलत चि राहिला । विस्तार करणें कासयाला । धन्य राजा तो दैवागळा । परमार्थ बिंबला गुरुकृपें ॥ उपदेशावरी येतीं विघ्नें । ते स्वल्पसंकेतीं करा श्रवण । आळस आणि वादइच्छा मान । सिद्धि अभिमान ज्ञातृत्व ॥ आधीं च याचे परिहारास्तव । गुरुरायांनीं रचिले उपाव । भय भक्ति क्रम

भजन भाव । निस्पृह लीनता सत्संग ॥ विचार विवेकें वर्तेल जो कां । किमपि तयाला न घडे धोका । आतां पुढारीं चरित्र ऐका । चढोवाढी अति गोड ॥ दासविश्रामधाम भेदक । मार्जी विसावला कपिनायक । भोंवते मिळाले सद्भक्त भाविक । गाती लाहती स्वात्मसुख ॥ इति श्रीराम कृपा । तारक परमार्थ सोपा । भजन-प्रशंश । वाईची बाई तरली । मन चंचचलें । व्यास दृष्टांत । कवन लिहिणें । कवन चिन्ह । राजास प्रसाद प्राप्त । विसावा चोवीस ॥ २४ ॥

## सोपान २८

(पान २०८ ते ११५)

नृपआज्ञेनें सद्गुरु खबरी । जासूद फिरती गिरिकंदरीं । येकदां करूनि सडे सवारी । महाराजाजवळी पातला ॥ टाकोनि लज्जा मी अहंकार । घातले अक्षा नमस्कार । स्तविलें करुणेनें जोडोनि कर । तीर्थप्रसाद लाहोनि ॥ आर्त-पोटींचें हें चि सुजाणा । राहों सन्निधीं लाहिजे आज्ञा । बहुपरी विनवितां श्रीगुरुराणा । हांसोनि बोलिले ऐक पां ॥ तुझ्या पदरीं गा राज्यपदवी । तरी नीतिन्यायें सुखें चालवीं । अनुसंधानीं राखोनि जीवीं । वर्त अलिप्तें भय काये ॥ राजा विनवी जी करुणार्णवा । राज्यांतें नरकं वदती देवा । उपाधी योगें परमार्थ ठेवा । सांपडेल केवीं मज दीना ॥ गुरुनाथ वदे पां ऐक गोष्टी । साक्षेप यत्ना राखीं हृत्पुटीं । अविश्वास आळस नाणीं दृष्टीं । राम भजोनि राम पाहें ॥ राजा म्हणे जी आज्ञाप्रमाण । नित्य दर्शना येत जाईन । गुरुराज वदती कांहीं दिन । फुरसत धरोन हें करीं ॥ तरि केल्यावांचून तीर्थसेवन । प्रशस्त न वटे करितां भोजन । तरि गा करोनि तीर्थासी रक्षण । सरतां येऊन घेत जाई ॥ साकारप्राप्ति जंवरी चरण । कां तीर्थं वाढी घालोनि जीवन । असो तीर्थपात्रसह राजनंदन । जाऊनि चालवी नेम धर्म ॥ येथें कल्पना उठिली भाविका । जाणत्याप्रति केली अशंका । तें तीर्थमहिमान अपूर्व ऐका । जें होय साधका सुखकारी ॥ जें हारक अज्ञानमूल संकल्प । जें निर्दाळी जन्मकर्मतें पाप । जें ठसवी ज्ञान तें मी चि स्वरूप । वर्तवी अलिप्तें पायवणी ॥ लाहोनि गुरुराजसान्निधान । वाया विकल्पा करूनि छेदन । नेमें पदतीर्थ करावें सेवन । जें तीर्थासी पावन करी तीर्थं । प्रारब्ध-योगें कीं गुरुआज्ञें । घडलें गुरुराया विघड होणें ॥ तरि वाढवीत तीर्था करिती सेवन । परि पात्रातें रक्षणें संकटें ॥ तरि चरणतीर्थाचें गंध काढोन । भरोनि ताइतीं कीजे स्वाधीन । त्या अपाय विपत्य न करी स्पर्शन । जरि

अविश्वासिया हरपल्या ॥ तों सद्गुरुपाशीं जाऊनि शीघ्र । पूजा करोनि विध्युक्त सांग । बाळगोनि ताइतीं गंध अव्यंग । तीर्थ सेऊनि तरावें ॥ नसल्यां गुरुव्यक्ति सगुण साक्षात । तरि गुरुबंधुजवळील घ्यावें तीर्थ । कीं पुजोनि साचावे समाधीतें । कीं घ्यावें परमादि गुरूचें ॥ नातरी आराधनादिनपर्यंत । राहोन उपवासी फराळ करीत । गुरुआवाहनीं ब्राह्मणतीर्थ । राखोन कृतार्थ साधिजे ॥ ३२ ॥ नाहीं गुरुबंधु ना परात्पर गुरु । नाहीं समाधि ना सगुण साकारु । ना विदित नसे चि पुण्यपर्ववारु । करावें त्यांनी मग कैसें ॥ ३३ ॥ हो करूनि उच्छाव संतर्पण । देवब्राह्मणांचें तीर्थ सांचोन । वाढवीत किंवा गंध भरोन । करावें सेवन नेमेसीं ॥ ३४ ॥ पराधीन पुत्र कीं सून बाईल । न बाणे चि तीर्थां राखों निखळ । तरि तीर्थश्लोक म्हणोन सप्रेमबळें । प्राशितां जळ तीर्थ पां ॥ ३५ ॥ हें भिडेस्तव भाविकालागीं बोलणें । शोभेना परमार्थां पराधेनपण । गुराशिष्य दोघां हि श्रम चि कारण । अहो उपासना तरी साह्य कीजे ॥ ३६ ॥ कोणी ह्मणती हो रस चि तीर्थ । तीर्थराजनिधी मेघतीर्थ सत्य । गंगादि जीवन कां आपासिलाधूत । हें असो ऊर्म्या तपोबळें ॥ ३७ ॥ प्रजन्यप्रतिमा पिंडीं शुक्लित । ह्मणती सेवावें हें तीर्थ सत्य । अन्नं ब्रह्म रसो विष्णु हे मात । बोन प्रसाद तीर्थ लवण ॥ ३८ ॥ मद्य सुरा कीं कनकबीज भांग । सेवितां कैफी विसरवी आंग । तें तीर्थ वदती दुर्विषयभोग । आत्मसुख ह्मणती मंदमति ॥ ३९ ॥ हें असो तीर्थ तें औट-कोटी देखा । बाहत्र हजार त्यांत नाडी-संख्या । तीनशें साठि त्यांत विदित लोका । त्यांत श्रेष्ठ दशनाडी घात दहा ॥ या सर्व तीर्थांचें अधिष्ठान । सत्य त्रिसत्य श्रीगुरुचरण । हरादि जाणती ते दिव्य खूण । सगुण निर्गुण गुरुपद ॥ ४१ ॥ समुद्रवळयांकित पृथ्वीतीर्थ । स्नानपानेनें जें पुण्य घडत । गुरु-पदांघ्रिबिंदु सेवितां प्रीती । वोपी तें श्रेय मानवा ॥ ४२ ॥ आतां ऐका हो कथा बरवी । जन्मांतरींचा राजा तपस्वी । कृपा केलीसे त्यावरी देवीं । विश्वासी आणि प्रयत्नी ॥ ४३ ॥ हेरजोडीच्या मुखीं गुप्त । नित्य विदितसा घेतो वृत्तांत । परी स्वामीलीळा ते अत्यद्भुत । देवादिकां ना कळे ॥ ४४ ॥ तीर्थ सरतां चि येतो शोधित । अपूं आणितां उमदे पदार्थ । परि राजधन वसन पादुका वस्त । स्वामीसमर्थां नलगे चि ॥ ४५ ॥ बहु श्रम करितां विश्वामित्र । ब्रह्मऋषी न म्हणे ब्रह्मकुमर । येक दोन वेळीं शुद्धतर अंतर । वळखोनि वदले ब्रह्मऋषी ॥ ४६ ॥ कुबेराच्या सदनाप्रति । भाळोनि आला जैसा पशुपति ।

इंद्रसहाची पाहोन भक्ति । शचिपति बोळे येकदां ॥ ४७ ॥ तेवि देखोनि शुद्ध भावार्थ । अंगिकार करिती कांहीं केचित । समर्थपदरजे बहु पुण्यवंत । शाभास घेत नृप मिरविला ॥ येरवीं रायाच्या भक्तिवंत ललना । मित्रादि रायाचे सुहृदजना । उपदेश न केले श्रीगुरुराणा । प्रार्थितां हि बहुपरि ॥ ४९ प्राकृत जनाची अशी वृत्ति । राजाचे नि वाढली म्हणती महंति । पारि आंखिले गुरूच्या नव्हे ते रीतीं । दीना सांभाळिती नैराशें ॥ ५० ॥ तैसे चि असतें जरी भुलवणें । तारि लक्षादिकीं होते सैन्य । तितुक्यास हि मंत्र फुंकोन । यादास्त लाविली वहींत ॥ ५१ ॥ येक घड ना माराभर चिंध्या । बहु स्त्रिया केल्या पारि त्या वंध्या । अनधिकारी चेले बहुधा । काय जाळावे नेऊनि ॥ ५२ ॥ काय उणें हो गुरु नामी दांभिक । शिष्य हो इछिती धनाढ्य लोक । पुढील नेणती सोय कीं सार्थक । आपुलें किंवा परावें ॥ ५३ ॥ अंतर्वेधी सहस्रांत येक । बोलिलें तैसें चालणें चोख । कामा न ये तें अयोग्य वाक्य । म्हणतां हि श्रेष्ठ कनिष्ठ ॥ ५४ ॥ तरणें तारणें सहवासगुणें । यास्तव वर्तावें बरव्यापणें । पाहोनि आपणा नाडती जन । तो दोषाचरण करूं नये ॥ ५५ ॥ पोहोनि उत्तम पुण्यवंता । अनुताप उपजे मोहभ्रांत चित्ता । सहज प्रियकरू होय भगवंता । वाढत चि जाय उपकारु ॥ ५६ ॥ यास्तव साधका निरवणें हें चि । संगति धरावी सदा भल्याची । त्यजावें खोडी काहणी लालची । जेणें निजाची सोय लागे ॥ ५७ ॥ धन्य दासाचें कथन पवित्र । बहुता प्रबोधें केलें सत्पात्र । ज्याचेनि बळाढ्य शिवराजपुत्र । अणु हि स्वतंत्र मानीना ॥ ५८ ॥ परि राजद्रव्यादि कांहीं पदार्थ । प्रार्थितां देऊं नेघती किंचित । परि संकटीं पडों नेदिती त्यातें । धन्य विरक्त सदा-सुखी ॥ ५९ ॥ धन्य दासाची विरक्त शोभा । मानविलें श्रीसीतावल्लभा । नृपाहूनि करिती लोभ गरिबा । जैसा हेरंबा शिव पाहे ॥ ६० ॥ बंधान राज्याचें चहुंकडे । न होय राजया वाटे सांकडे । नमितां येकदां उतरलें तोंड । देखोनि गुरुवर्यें जाणितलें ॥ ६१ ॥ पुसतां काय पां लागलीं चिंता । नेदवे उत्तरा साशंकचित्ता । मग कालोचित वदले नृपासी दाता । राज्यमुलुक दक्षणा दे कांहीं ॥ ६२ ॥ साळसुदीचे जे चालत असेल । दस्ताखालील देश तो सकळ । तुम्ही तुला तो असों दे सगळ । स्वख-र्चेपर वेंचा धर्मार्था ॥ ६३ ॥ जे बंधान कराया असेल अवघड । दुर्घट नद्यादि पर्वत पाहाड । त्यांतील कांहीं आम्हा रोकड । दे स्थान निवांत क्रीडावया ॥ ६४ ॥ हें ऐकोनि राजा महा आनंदें । ततःक्षणी लिहिवली सनद । आठऊनि हृदईं श्रीगुरुपद । केली सिक्का ते स्वहस्तें ॥ ६५ ॥ त्रयदिशा समुद्रवळयांकित ।

अटक नदीपासोनि आरत । आपुलें परावें न म्हणे किंचित । राज्य समस्त रोखीं असे ॥ ६६ ॥ पत्र ठेऊनि नमितां पाया । तव हास्य आलें श्रीगुरुवर्या । वदले भोळा रे तूं गा राया । अटकाहूनि अटकला कां अटकें ॥ ६७ ॥ श्रीरामें दिधलें ऐसें देणें । स्वराज्य आमुचें हें त्रयभुवन । सनद पुस्तकीं ठेवीं बांधोन । आतां आपुलें म्हणों नको ॥ ६८ ॥ धन्य रायाचा थोर भावार्थ । गुरुराजध्यानीं सर्वदा चित्त । करभारादि यथास्थित । जालें बंधान इच्छापरी ॥६९॥ प्रजा राजीनें वर्तती बहु । उमीद वेवहारिया नसे गोऊं । नूतन सत्पुरुष येती विसाऊं । आर्थींचे नांदती सुखरूप ॥ ७० ॥ पावतो मुशारा चाकरमाना । देऊं विलंब नाहीं वेतना । देवदेवालयधर्मकर्मस्थाना । चालती मर्यादा येकाशें ॥ ७१ ॥ स्वयें राजा तो परम चतुर । गाणें वाचणें नेमणें सुंदर । शौर्यवंत प्रतापी धीर उदार । रामभक्त भला गुरुदास ॥ ७२ ॥ येकदां संशयो उठला वृत्तींत । गुरुगुलाम मी दीन बहुत । परि केवि म्हणूं सर्वां दंडवत । राहतां मुकाटें बरें न दिसे ॥ ७३ ॥ ऐसियांत घेऊनि महाराज भेटी । नमोनि तिष्ठतु जोडोनि करपुटी । समर्थ वदले कां लपविसी गोष्टी । संकल्प पोटींचा न वदसी ॥ ७४ ॥ तूं राजा महाराज आम्हा वदसी । जय राम वदतो आम्ही नमित्यासी । तरी राम राम सर्वत्रांसी । वदत मर्यादा चालवी ॥ ७५ ॥ उभयपक्षीं घडेल स्मरण । ते भजनप्रभावें होतील पावन । मानलें राया आज्ञा प्रमाण । दंडक चालिला अद्यापि ॥ ७६ ॥ कृष्ण कृष्ण गुरुजी सदाशिव । आणीक आपुल्या देवाचीं नांवें । लिहितां नमितां घेती सर्व । तो दंडक नृपदंडका-मागें चि ॥ ७७ ॥ असो तो पहिला कामिक नृप । नाभीच कराया घोरतर पाप । तो लाहोनि अनुताप श्रीगुरुकृपें । पुण्यश्लोकपंक्तीं बैसला ॥ ७८ ॥ प्रारब्ध प्रमाण मानोनि अधीर । कितेकांनीं पडले सिंतर । कटाक्ष कराया पाहतां गुरुवर । कांहींच टेकणें नलगे चि ॥७९॥ येथें युक्तीनें वदला हटी । भाळीं गुरु व्हावी सुकृतगांठी । ते नेणती हो गुरुगम्यराहटी । स्वतंत्रता असे तेथें पां ॥ ८० ॥ हे उपनिषदाचे स्वल्प वाक्या– । वरूनि बहुतांनीं केली टीका । असो हें आतां कथन ऐका । गुरुभक्त शिवाजी नृपाळ ॥ ८१ ॥ गुरुकृपें बसला बंधानदाब । सांगतां हेरांनीं समारंभ । कोपोनि पादशा अवरंगजेब । नृपप्रांत खराब करूं पाहे ॥ ८२ ॥ देशांत होईल खट आटघाट । प्रजादिकांसी वाटेल संकट । भूप हि मानी मांडलें अरिष्ट । परि म्हणे कर्ता श्रीराम ॥ ८३ ॥ परम सुखदाचें घडतां दर्शन । प्रमाण केला नृपनंदनें । ठाकतां उभा गुरु दयाघन । वदले भक्तासी भय काय ॥ ८४ ॥

देवा भक्तांची मोठी आवडी। व्याघास्तव आला पडोन उडी। सावजभावें बांधोनि पिछोडी। आणोनि ब्राह्मणा भेटविला ॥ ८५ ॥ श्वेतवाहनाचा देखोनि भाव। स्त्रीरूप धरोनि आला देव। पूजितां शबरांनीं फुटका ग्राव। गंगाधर स्वयें प्रगटला ॥ ८६ ॥ अत्रि अनुसयाभक्तीच्या बळें। छळोन त्रयदेव जाले बाळ। मार्कंडेया झेपतां काळ। श्रीजाश्वनीळें सांभाळिला ॥ ८७ ॥ उमज हा पडतां अंतरा अंतर। तोषोनि तेणें गेला नृपवर। मग समर्थमहाराज करुणाकर। वनीं प्रवेशले येकटे ॥ ८८ ॥ भक्तास्तव केवळ निरापेक्षा। शानशा भेटीं उपजली इच्छा। येकांतशयनीं असतां पात्छा। तेथें चि प्रगटले अवचट ॥ ८९ ॥ अविंध यातीचा राजा निपुण। तपस्व जयाचें थोर दारुण। क्षोभतां ज्यावरी देवी ब्राह्मण। इलु हि अपाय न होये ॥ ९० ॥ चाले दिगांतीं ज्याची सत्ता। होतसे आवडलें जें जें चित्ता। महापुरुषपणाचीं नांवें ऐकतां। पीडोनि करी तो परीक्षा ॥ ९१ ॥ चहुंकडे बंधानें असतीं कपाटें। अंधार पडलासे काळकीट। चौकीपाहरेत जागती सुभट। गल्बला बोभाट नसे चि ॥ ९२ ॥ पादशा असतां सेजावरी। वरिवरी येतसे उल्हासलहरी। तोषोनि भाविला तेणें अंतरीं। भेटतो कोण कीं सज्जन ॥ ९३ ॥ तंव पुढें देखिले सिद्धपुरुषा। नमनादर करूनि फारसा। बैसवोन आसनीं पुसे पादशा। कैसे वलीजी आलेती ॥ ९४ ॥ हो बंधन कहींच नेणती मुक्त। मोकळा च कीं परमार्थपंथ। पुण्यवंत तुम्ही पुरऊं हेत। कृपा केली हे श्रीरामे ॥ ९५ ॥ जी सरस आपुलें वास्तव्य कोठें। जाणसी तरी पां अलक्षपेठ। जे स्थळा जाऊं भरितां वाट। संग अणुमात्र न साहे ॥ ९६ ॥ जी कळलें सर्वस्वी निस्पृही आहां। स्थान मान व्हावें अगत्य देहा। तरि ऐका हरिकृपें वागतों पाहा। कृष्णातटाकीं काननीं॥९७॥ तैसे चि कहो जी नामाभिधान। भला जन वदती बंदकमीन। जी पीर पीरा बंदे कारण। दाविता लीळा अघटित ॥ ९८ ॥ बोलत चि ऐसे सरस थेट वाक्य। आठवोन मनी स्वभाव दंडक। परीक्षार्थ पुसे देव तो येक। किंवा दोन सकळांसी ॥ ९९ ॥ ऐसे ऐकोनि भोळावतारी। न सावरतां प्रबोधलहरी। पदें दोन कथिलीं कवण्यापरी। ऐका साधकनो प्रांजळ ॥ १०० ॥ ऐसा असे पां बोध सुगम। सर्वांभूतीं पावोनि सम। सांभाळिजे सहज स्वधर्म। येरवीं व्यापक परमात्मा ॥ १०१ ॥ ऐकानि येक तो सर्वांतरस्थु। पादशा पुसे कां भेदसंस्थु ॥ गुरुराज वदले श्रीगुरुनाथु। हा दाविला पथु भक्तीस्तव ॥ १०२ ॥ वेदखुरानीं जे नियम वचनें। निराळी भाषा ते सकळा प्रमाण। अविंध वद तैं तुम्ही सर्वज्ञ। मनोरथ पूर्ण करावा ॥ १०३ ॥ तुम्ही कमाई सिद्ध प्रसिद्ध।

नाणितां आडवा अनुमानभेद । करूनि तवज्ञः ध्यावा प्रसाद । विधिनिषेध काय सर्वात्मया ॥ १०४ ॥ बहु नम्र दावितां अतिनिग्रहोनि । कपट जाणितलें श्री मोक्षपाणी । प्रतिशब्द वदले तो चि पां ज्ञानी । स्वधर्मकर्म सांभाळिता ॥ १०५ ॥ यद्यपि तुम्ही ऐश्वर्यवंत । पंक्तिकर होणें कठीण बहुत । यवनेश वदे दृढ असे चित्त । म्हणोनि भोजना आणविलें ॥ १०६ ॥ मांसघृतानें चपचपीत अन्न । पोलाव साणक पुढें ठेऊन । स्वीकारा म्हणे कर जोडून । तंव हास्य आलें समर्था ॥ ७ ॥ अपसव्य अन्न हो जाणोनि परम । स्मरोनि मोठ्यानें श्रीरामनाम । झोळींत घालोनि दिव्य हस्तपद्म । द्वयपिल्लीं काढिलीं डुकराचीं ॥८॥ पात्छा निरोपिलें घाली छुरी । रक्तमांस मिळवी पात्रांतरीं । हक्कहलाल करिसी जरी । हराम चाखूं सिद्ध असे ॥ ९ ॥ कर्मधर्म आपुला हटें थावरी । दूषण आरोपी दुसऱ्यावरी । तें मूर्खकथन पां करूनि दुरी । तामलुकमा अंगिकारु ॥ १० ॥ गदगदां कांपे तेणें अविंध । क्षमा करी वदत सर्वापराध । लवलवों नमोनि स्तविता बहुविध । हो सावध बा म्हणतिलें ॥ ११ ॥ तंव पुढें पाहतां उघडोनि नेत्र । खोन ना शरपोष डुकर पात्र । मग ममता असों दे म्हणोनि गुरुवर । उठोनि उभे ठाकले ॥ १२ ॥ पादशा भावी कोण्यामार्गें । जाती तैसा चि करावा लाग । तंव अखंडैक्यरस दास निःसंग । जेथील तेथें सामावले ॥ १३ ॥ कर्माचरणीं हा न घडे योग । न घडे योगातें सिणतां अनेग । हरिजन धन्य ते समर्थ स्वार्गे । लीळा विचित्र न जाणवे ॥ १४ ॥ सिष्यवर्ग मेळीं प्रगटले इकडे । तळमळित बैसला पादशा तिकडे । भाविला याचेनि थोर बळाढ्य । जाला शिवाजी नाटोपे ॥ १५ ॥ समर्थयोगाचा धरोनि खोप । करवी तिकडील स्वारी मवकुफ । परंतु योजितो नाना आटोप । करूनि नृपासी जिंतावें ॥ १६ ॥ कृपा जाहलीसे समर्थांची । अधिक चि शक्ति होतसे नृपाची । अपाय आस्था जे चिंती त्याची । जेथील तेथें जिरतसे ॥ १७ ॥ हें असो काननीं विसांवा घेत । सिष्यमेळीं राहिले समर्थ । बोध शोध कथिती अधिकारपरत्वें । घाडिती जाणत्या महंति करूं ॥ १८ ॥ संनिद्ध ठेविती आस्थावंता । आणवोन घेती चहुंकडील वार्ता । नेणत्या बाळासी घालऊनि कित्ता । शाहणे करिती त्या कृपें ॥ १९ ॥ येकदां काननीं असतां समर्थ । साधनीं वर्तती सिष्य समस्त । येऊनि शिवाजी दळभारसहित । नमोनि विध्युक्त बैसला ॥ १२० ॥ तंव सरदारांनीं काढिल्या गोष्टी । बळें हांव बहुपरी धरितां पोटीं । युद्धप्रसंगीं धैर्यत्रुटी । पडोनि मोड

होतसे ॥ १२१ माजला गलबला उत्तरा उत्तर । कांहींच न बोले नृप सत्त्वधीर । नाभिकार तेव्हां देऊनि गुरुवर । बोलिले सिध्यर्थ ऐका कसा ॥ २२ ॥ थोर थोर शूरांनीं तैसें चि केलें । प्रचीतीनें जयवंत जाले । यापरी नृपा सांभाळिलें । तें कथनीं वर्णिलें नव जाय ॥ २३ ॥ दासविश्रामधाम सुंदर । सुतर्क हयपति प्रेमसूर । सद्भक्तयात्रा मिळाली थोर । स्वात्मसुसौख्य पाववया ॥ १२४ ॥ इतिश्री रामचंद्रकृपा । तारक परमार्थ होय सोपा । रामाया वळगाया प्रस्तावा सांगणें । राजप्रार्थना । भाव । तीर्थ प्राप्त । दक्षणा खाले राज्य देणें पाछाउ भेटणें । झोळींतून डुकरपिल्लीं काढणें । कित्ता घालणें । दंडास सिफायाला मारुति बाधविले । सोपान अठावीस ॥ २८ ॥

## स्कंद २९

( पान २१८ )

म्हणाल श्रोतेनो दास विरक्त । धनमोल देऊं कोठें होतें । तरि जे जे वनीं जें असतीं दैवतें । सांभाळूं फिरतीं सभोंवतें ॥३५॥ लागलें रघुनाथीं जयाचें चित्त । तो चि निस्पृही थोर समर्थ । त्या प्रसन्न होऊनि सर्व हि दैवतें । अपेक्षित पुरविती ॥ ३६ ॥ येऱ्हवीं जयाचा शिष्य शिवाजी । भलेभल्यांनीं वदती जी जी । चालतां स्वभावो गिरिदरीमार्जी । धावे सांभाळूं भगवति ॥ ३७ ॥ सकळ हि गडामाजील देव्या । गुरुकृपें प्रसन्न असती तया । भूगत द्रव्यातें दाऊनियां । सधनी करोनि वागविती ॥ ३८ ॥ प्रयत्न न करितां राजा कांहीं । दुसरीं अवस्थीं प्रगटोन देवी । द्रव्यस्थळ दाऊनि सांगती घेईं । मावळगती समर्था नवल काये ॥ ३९ ॥ संकल्पासरसी पावोन भवानी । धन वोपिलें तें ततःक्षणीं । हें असो तरूकडे श्रीमोक्षपाणी । लक्षोनियां ऊठिले ॥ ४० ॥

## स्कंद २९

( पान २२१ )

आतां ऐकावें पुढील कथन । तीर्थास्तव शिवाजी वेंघला रान । जासूद आले फिराफिरोन । वर्तमान कोठें न लागे ॥ १०० ॥ आणिखी शिष्य ते गुरुकारणें । हिंडती श्रमत रानोरान । कितेकीं वर्जिलें अन्नजीवन । करिती भाविकी व्रत-तप ॥ १०१ ॥ तंव दया उपजली सर्वज्ञराया । समुदायसहित येऊनियां । राहिले रम्यतर पाहोनियां । कृष्णातटाकीं वनस्थळ ॥ १०२ ॥ कितेका सिकविलें गाणें स्वयें । चातुर्य ज्ञान ध्यान उपाय । दाविली कितेका परमार्थसोय । योगान्वय स्थितिगत ॥ १०३ ॥ शिष्य नूतन बहुत जाले । कितेका महंति

करूं धाडिलें । कल्याणजीचा भाव न ह्माले। करितां हि परता न होती ॥ १०४॥ कसोन पाहती बहुत कांहीं । डंडळीना निश्चयो कहीं । नवल वाटलें गुरुराज-हृदई । सत्त्वासी पाहूं योजिलें ॥ १०५ ॥ हा वृत्तांत अवघा पुढें कळेल । शोधीत पातला तेथें नृपाळ । श्रम तयाचे जालें सफळ । दर्शन जालें गुरूचें ॥ १०६ ॥ नमोनि स्तवन करी आनंदें । ससांग सारोनि पूजाविध । लाहोनि सुकृतीं तीर्थप्रसाद । गेला स्वस्थाना गुरुआज्ञें ॥ १०७ ॥ नियमोन हेरातें नित्यनित्य । आणवोन तोपतो जाला वृत्तांत । आपण हि येतो सरतां तीर्थ । न्यायनीतीनें वर्ततो ॥ १०८ ॥

# अवधान ३०

## ( पान २२९।२३० )

इकडे शिवाजीराजयाप्रति । हेर हरकारे जासूद सांगती । बहुपरीं शोधितां दृष्टीं न पडती । गुरु शिष्यमंडळी कोठें हि ॥ २३ ॥ बहुशा राया रे वाटतें जोवीं । गुप्त प्रगट होती ठाईच्या ठायीं । न वर्णवे चि लीळानवाई । सिद्ध-पुरुष देव कीं नेणवे ॥ २४ ॥ येकायेकीं नूतन लोक । मिळती वागती मोठें कवतुक । नेमोन न राहती स्थळ तें येक । भजनभाक्ति करिती निर्भयें ॥ २५ ॥ तळमळोन वेद तंव तो राव । शोधूनि काढा रे जीवें भावें । धुंडीत निघाले आज्ञाप्रभावें । चाकरीनातें कठिण वदतां ॥ २६ ॥ कोणी म्हणती राजा चेवला । निग्रहें मनस्वीं पिसाळला । विद्यावंत आप्त ते भाविती याजला । मोहन केलासे गोसावीनें ॥ २७ ॥ जाणते म्हणती नृपभाव निका । लाता हाणोनि विषयसुखा । अलिप्तदशेनें वर्ततो देखा । मीनला श्रीरामीं गुरुकृपें॥२८॥ त्रिविध बहुविध जनलाजराहटी । टाकील तो भला भक्तवीर जेठी । कथा तयाच्या श्रवणपुटीं । पडोन जिराया हरि अर्जिजे ॥ २९ ॥ इकडे कल्याणा गोंवितां नेमीं । आज्ञानुलंघवें मौन्यत्वधर्मी । ठेला गुरूतें धरोन हृत्पद्मीं । जपनेम साधित कवन लिहित ॥ ३० ॥

# दासविश्रामधाम अध्याय ३६

## ( पान २७९ ते २८० )

वृत्ति जडलीसे श्रीरामरंगीं । अन्यत्र भावना नसे या लागीं । न पडती मानेच्छाधर्गीं । त्यागी ना भोगी भक्तराज ॥ सत्पुरुष ऐसा जो क्षेत्रा न येतां । व्याज्य बहु लागलें ह्याळसाकांता । करूं नका हो अनुमान सर्वथा । संतजन

मान्य सर्वत्रा ॥ तीर्थ हो क्षेत्र हो आश्रमस्थान । पर्व हो महोछाव संतर्पण । कथा हो कीर्तन देवघर सदन । न येतां सज्जन न शोभे ॥ काय जाळावी विद्या महंती । सत्पुरुष जेथें न वागती । असो तळमळ करूनि हयपति । दासा घरा आणूं पाहतसे ॥ येतां बोलाऊं स्वयें मार्तांड । न धरिती कांहीं त्याची भीड । बाणाईवरा पडलें सांकडें । भक्तप्रिय भोळा म्हणोनि । संधि सांपडली टपोनि जपतां । माव ऐसा तो केला अवचिता । शिवाजी राजा होवोनि स्वस्था । आला सामोरीं सत्पथीं ॥ उतरवेना घोड्यावरूनि । नमन न करवे अश्वा मोजुनी । न उठवे पडला दंडप्राय धरणीं । निराहार घडला अश्वा दिन ॥ कोमेजलेंसे मुखारविंद । तोंडावाटें न निघेचि शब्द । हे देखोनि अवस्था ब्रह्मविदें । आश्वासूनि वार्ता पुसियली ॥ नमोनि नृपानें जोडोनि हात । वदे संग्रहींचें सरलें तीर्थ । गिरीं काननीं शोध घेत । फिरलों आठवित दिव्य पदा ॥ अपराध क्षमा कीजे दयाळा । मी दैवाचा जगीं या आगळा । हाणार हो असोसी मजला । नसेचि कांहीं येथुनी ॥ म्हणाल श्रोते हो खंडोबा स्वयें । कां दास-मनुजाचे वंदिले पाय । अहो भक्तीचें बळ थोर आहे । देवराया आवरक ॥ भक्तिरूपें तो बंदिखाना । अडकला हृदयीं देवराणा । सोहं मार मार करितां जाणा । काकुळत ऐक्य करी बहु ॥ भक्ति नव्हे ते देवजननी । थोरीव कायसी ते मातृसदनीं । हो साहेल नीचता तो होय धनी । कीं भक्तिरसें वेडावला ॥ काय चोज हें दंडवताचें । कार्य संपादिले नीच बहु नीच । रूप धरूनि कामिनीचें । मन अर्जुनाचें मोही हरि ॥ पडेल जैसा कार्य प्रसंग । तदुपरि भक्ता दावी सोंग । भक्तचरित्री पहा अनेग । लक्षणें असती प्रतिपाळक ॥ असो शिष्याचे देखोनि कष्ट । दाससमर्था वाटलें संकट । सत्शिष्यांनीं आणिजे पीठ । तरी ग्राम सन्निधी नसे चि ॥ काननामाजीं पडलें घटन । डोंगरारण्यीं कैचें जीवन । मग हळुच बोलिले नृपा निरखोन । तूं तरी युक्ति सांग पां ॥ भावी देवांनीं बहु निकें जाले । आतां साधीन कार्य आपुलें । दाऊनि विनयो वदे मंजुळ । जी स्वामी समर्था ऐसें असे ॥ किमपि होईना मी अश्वारूढ । चालवेना वाळलें तोंड । पुढें आहे तो गांवापुढें । सैन्य आमुचें उतरलेंसे ॥ जी दीनदयाळा अश्वावरी । बैसोनि पुढें जावें झडकरीं । वोपूनि तुरंगा चवें-दार करीं । पानगे सिद्ध करावे ॥ कल्याणसखया ठेविजे येथें । सांभाळूनियां आणितील मातें । हे युक्ति बहु बरी म्हणोनी समर्थ । वाजीवरी बैसले ॥ झाळसापतीचा कपट घोडा । उधळोन निराळा चालिला दडदडा । नसे वेगासी

उमपु जोडा । वाटे गाणासी विचित्र ।। खेळणार नभीं ग्रासितां समीर । शूर प्रतापी बाळस्वार । डगमग न होती न होती घाबिरे । अनुसंधानीं विनटले ।। श्रीरामचंद्रा आठवोन ध्यानीं । पाहों लागले जंव नेत्र उघडोनि । कांहींच न दिसे अद्भुत करणी । खंडोबा असे सन्मुखी ।। पाहोनि दासा हास्तु देव । कपट जाणितलें महानुभावें । जी देवा सिणलेति म्हणोनि भावें । नमितां उचलोन आळंगिलें ।। देव भक्त मीनले येक्या ठाई । द्वैताद्वैत नाठवे कांहीं । तैसाचि सावध होऊनि विदेही । विनविलें पुरला मनोरथ ।। आज्ञा करावी कानना जाऊं । ऐकोन कळवळा करी देव बहु । भोजनानंतरीं निरोप देऊं । म्हणतां कर्मादि सारिलें ।। म्हाळसाईनें केलें धावणें । दासें देवाचें केलें पूजन । आरती गाईले करा श्रवण । येकदां च लिहितों पुढारीं ।। जेऊनि भाले सांग देव भक्त । विडा घेऊनि बैसले स्वस्थ । रणनवरा वदे यावें अगत्य । पुनरपि येथें यात्रेसी ।। वदोनि तथास्तु करोनि नमन । जातां आठवला शिष्य कल्याण । काननामाजीं राहोनि सज्जनें । पाहिलें कृपेनें पर्तोनि ।। इकडे शिवाजी होतां गुप्त । कल्याणस्वामी जाले तटस्थ । जाणोनि ह्यपती गौरव समस्त । पालिवाकडे पातले ।। गुरु शिष्यांची जाली मिळणी । विसावले तये काननीं । धावा ऐकोनि श्रीचापपाणी । येऊनि आदरिलें दासासी ।।

## अध्याय ४२

(पान ३२१-३२२)

ज्वाळवदन आणि पटायितांनीं । केलें कळवितां कपटकरणी । हांसोनि मग वदे कोदंडपाणी । जालें सर्वस्वें उत्तम ।। ऐसियापरी प्रबोध करित । समूहा कृपेनें सांभाळित । शाहापूराहूनि पुढें समर्थ । डोंगरामाजीं राहिले ।। सत्तापण ज्याचें थोर बलिष्ठ । थाटे तेथें हि सौख्य यथेष्ट । साधु निस्पृही ज्ञाते वरिष्ट । घेऊं विसांवा येताती ।। सद्गुरुभजनीं निष्ठावंत । शिवाजी राजा पातला तेथें । प्रार्थूनि सद्भावें गुरुरायातें । संतर्पण करवितु ।। दर्बार दासाचा सौख्यकर थोर । समसमान जेथें लहानथोर । अयोग्य अश्रधा नसे अणुमात्र । साह्य सर्वार्थी श्रीराम ।।

## अध्याय ४३

(पान ३३०)

उत्तम गुणाचे धीर चतुर । माहाराजाचे सिष्य अपार । श्रीरामभजनीं

असती तत्पर । पायवाट केले भवाब्धी । राजा सिवाजी भक्तिवंत निपुण । आणवोन घेतसे वर्तमान । सर्वदां कष्टतो भेटीकारण । करितसे चिंतन गुरूचें ॥ आणितां समर्पू वस्त्रादि भूषण । पावलें म्हणती विरक्त सज्जन । तत्समंधीं सेवकगण । त्याचे ही पदार्थां न सिवितो ॥ तो नृपवर्य आला दर्शनास्तव । आणीक मिळाला भक्तसमुदाव । भोगिती सोहळे भिक्षावैभव । वानिती थोरीव परस्परीं ॥ करूं उल्हासें परिपूर्ति सेवा । दाऊं स्वधार्मीचा परमार्थ ठेवा । प्रार्थितां नृपांनीं सद्गुरुदेवा । न घेती कदा मनावरी ॥ सदना न येती गुरुदयाघन । कांहींच न जालें पदार्थ अर्पण । ह्मणोनि नृपाचें म्लानलें वदन । बोलिले सज्जन ऐका कसें ॥ अरे आसेल जें जें कांहीं तुजपासी । तें आधींच पावलें मग काय देसी । संशयो नाणी कांहीं मानसीं । होई सादर परमार्थी ॥ सर्वां हितकर ऐक वचन । विभवसंपत्ती तें रामचिंतन । कामा नये दुश्चित्तपण । सावध असावें सर्वार्थी ॥

# अध्याय ५२

## ( पान ३९९ ते ४०१ )

धन्य दासाचे सिष्य सद्भक्त । आज्ञा उलंघु न करिती किंचित । पहा शिवाजीराजा प्रस्तुत । वंदोनि आज्ञा ते काय म्हणे ॥ भांडारसदनीं धनधान्य-वस्त्रें । उंचनीच मोलाचीं असती फार । कोणकोणाला कोण्या प्रकारें । उचित करावें तें सुचविजे ॥ हें ऐकतां गुरुराया मानली मात । म्हणतिलें दाता राम-समर्थ । पूर्ण करोनि घेई पां हेत । संकोचित संशय टाकुनी ॥ जातील जाणारे स्वस्थळासी । येतील पुसाया आज्ञापासी । सर्वांतरात्मा कळवील तुजसी । उचित करावें जें कांहीं ॥ ऐसियापरी लाहोनी वरद । निपुण सर्वार्थी जाला सावध । उघड करोनि भांडारसमुद । साहित्य विविध करविलें ॥ तिकडे वैदिक हरिदास गोसावी । जोगी जंगम फकीर फाई । आलोचन करिती मिळोन सर्व हि । असतां चि येथें समर्थ ॥ निरोप घेतां मिळेल कांहीं । येरवीं दास उदास निस्पृही । उठोनि जाती कीं कवण्या समई । सत्ता आमुची मग कायसी । परवां च स्वामींनीं परतूनि तोंड । लक्षित होते हो काननाकडे । परंतु अवध्यांची मिळोनि भीड । आडवोन राहविलें वाटतें ॥ बोलती सर्व हि सत्य हे मात । जावया उदईक असे मुहूर्त । योजूनि यापरीं उगवतां आदित्य । फकीर दोस्त पातले ॥ देऊनि स्वामींनी तयासी मान । बैसऊन बोलती हितगूजवचन । अनायासें तें करा हो श्रवण । जे खुदापरस्ती सुखावले ॥

हा बुद्धिवाद ऐकतां तोषले फार । मग राजयानीं वोपिलें वस्त्र । देऊनि सिदोरी वाहतील भार । तितुकें उदारें धन दिलें ॥ वानीत दासांला गेले ते वली । मग शिवभक्तांची पातली मंडळी । बैसऊन मानें त्या सभास्थळीं । बोलते जाले सुखगोष्टी ॥ बोलणें लागलें साधनयुक्त । धन्य जगीं या जाणता महंत । निज-निर्विकारीं असे विश्रांत । म्हणतिले ऐका कवण्यापरी ॥ ऐसें ऐकोनि तोषले जीवीं । स्वानंद–सागरीं नाहले सर्व हि । म्हणती ऐसा हो विरळा अनुभवी । तों रुकसत करूं राजा उठिला ॥ देऊनि सिधा आणि धन वस्त्र । योग्यता नव्हे हें म्हणे नृपवर । बापा रे तुझ्लें लक्षप्रकारें । म्हणत नमोनि गेले ते ॥ पटीं विराजतां श्रीरघुनायक । मागोनि मिळाले जैसे याचक । मनोरथ तयांचे पुरविले अस्क । तैसें चि भासे येथें हि ॥ ललितप्रसंगीं थोरीव प्रशांशी । ऐकतां कीं उच्छावदिवशीं । वानिती जनीं या गुरुदातयासी । प्रत्यक्ष पाहिलें भाग्यवंतीं ॥ मग भट्ट गोसावी वैदिक ब्राह्मण । वेदज्ञ जाणते विद्वज्जन । येवोन पावोन बहु सन्मान । बुद्धिवाद ऐकत बैसले ॥ मग वोपूनि फराळ सरंजाम । वाहतील तितुकें देऊनि दाम । धाडिले हरकारे समागमें । स्वस्थळाप्रति पोहोंचविलें ॥ मग भजनकर्ते घेऊं निरोप । येतां सन्मानिलें बहु तया भूपे । गुरुराज म्हणती सुलभ हें सोंप । भजनसाधन सकळांसी । तंव अनुभवी म्हणती हे गुरुवर्या । भजनसीळाची उत्तमचर्या । तरि तपी सज्ञानी न करिती कासया । प्रत्यक्ष येथें आहेत कीं ॥ गुरुराज सांगती भजनाविण । कैसेनि होती ज्ञानसंपन्न । साधका बोलिलें भजन । नाचणें उडणे धुमाळी ॥ सिद्धअनुभवियाचें भजन । जाणिजे आत्मनिवेदन । यद्यपि त्याला असे साधन । श्रवण मनन अध्यास ॥ ऐकोनि ऐसें निजसौख्यभाषण । डोलले सिद्ध ते पावोनि खूण । मग भजकांनीं पाहिजे तें घेतलें मागोन । वीणाटाळादि अगत्य जें ॥ आहेर पावले रंगीत वसन । बांधोनि घेतलें द्रव्य दिव्यान्न । बुकाहारानें करितां भूषण । गेले वानीत सत्कीर्ति ॥ कोणी धातूचा न करिती स्पर्श । पदार्थमात्राचा न धरिती हव्यास । तया प्रीतीनें रामदासें । वोपिलें स्वकरानें प्रसाद ॥ परिमळहार तों सर्वत्रांप्रति । लेववोन धाडावे हे सहज पद्धति । सिद्ध तपस्वी योगी महामती । ज्ञानी ध्यानीं हो संतोषले ॥ भणगभिकारी धनिक जाले । वस्त्रपात्र पावतां वानीत गेले । मग गांविचे याचका बोलाविलें । वोपिलें वसन धन क्षेत्र ॥ महंत आले जे भेटीस्तव । त्यांस स्वामींनीं केलें गौरव । नमनमो स्तऊनि सांगूनि अनुभव । स्वस्थळा

गेले वानित ॥ मग सारूनि स्नानादि विधिविधान । सहसमुदाई केलें भोजन । जाऊनि येकांतीं बैसले सज्जन । शिष्यगणासी हित कथित ॥ नेमस्था धाडिले कार्यावरी । साधकी वसूं गेले विवरीं तीरीं । महंत निघाले करित फेरी । राहिले संगी नेमिले ते ॥ प्रातःकाळीं उठोनि सज्जन । प्रयाण करितां यात्राकारणें । नमोनि राजांनीं बोले वचन । सर्वानुकूळ न्यावें जी ॥ येरु वदती कासया जोजार । पुरविता दाता श्रीरघुवीर । जी त्याचें च सर्व हि म्हणोनि नृपवरें । सरंजाम सिद्ध करविला ॥ होन रुपया येक गजभार । खुर्दा साहित्य स्वारी चार । थोर येक निशाण द्विरदावर । कांहीं दळभार इतबारी ॥ भोजनसाहित्य फराळ वस्त्रे । भांड्यादि वोझेला बैल उष्ट्र । रथ पालखी कोतल रहिंवर । करूनि स्वल्पांत शोभा बहु ॥ परामर्ष साहित्य करायलागीं । कारकून ब्राह्मणे नेमूनि संगीं । आणितां बोलती मग राजयोगी । हो कां नांवास्तव सेवा करिसी हे ॥ यात्रा देवेच्छें होईल सांग । म्हणोनि पुढारी धरिले मार्ग । राजाप्रजादि लोक अनेग । बोळवीत चालिले गजरेंसीं ॥ राहविलें बहुतेकां देत निरोप । राणवना पातले सद्बोधबाप । अन्हवणी पाई येतसे भूप । स्थिरोनि बोलिले मग त्यासी ॥ आतां स्वस्थळाप्रति जाई । बहु सावध होऊनि राहीं । ऐकोनि मस्तकु ठेविला पाईं । उठोनि उभेला सन्मुखीं ॥ हृद्गतवर्म ते विदित दयाळा । देखिलें नृपमुखीं मंदली कळा । पुसिलें कृपेनें काय मनाला । चिंता लागली ते सांग सत्य ॥ जी दयाळा नोकिती मार्गे पंडित । न कळे स्वामींचा ठाव कुळगोत । कोण शाखीचे कोठिले आहेत । आदि अंत न कळे आश्रमादि ॥ न कळतां आदौ गुरूचें मूळ । कैसेनि तरती भजनसीळ । ऐसें वदताती तरी बहुकाळ । धरी न होय धैर्य पुसावया ॥ ऐकोनि यापरी हास्यमुखें । वदले आम्ही रे रामसेवक । सर्व आमुचा श्रीरघुनायक । वर्तमान आसक जग जाणती ॥ येऱ्हवीं लोकांच्या अविचार रीती । येऊनि सुजन्मा वायां जाती । तैसें न केलें आम्हां रघुपती । पूर्वी आतां हि सांभाळिलें ॥

## अध्याय ५७

### ( पान ४३७ ते ४४२ )

भक्ताभिमानी करुणाघन । श्रीराम सावळा राजीवनयन । भक्तास्तव जयाचें साकारपण । न विसंबे क्षण दासासी ॥ पुरऊनि तात्काळीं मनोरथ । केलें दासांसी आनंदभरित । वनीं विसावले लीळा वानित । ऐका चरित्र हें त्यांचें ॥ सिंगणवाडीस राहिल्या-उपरी । कीर्ति बहु फांकली देशांतरी ।

समुदाव हि मिळाला भारी । येती दर्शना बहु लोक ॥ झोळ्या फिरविती जेवि मर्यादा । भाविक हि आणोन वोपिती सिधा । तुच्छ ज्या ठाईं इंद्रादि संपदा । मा उमा वाणी साह्य जेथें ॥ खाती जेविती जन सुखावती । गाती नाचती कीर्तन ऐकती । स्तविती विनविती उपदेश घेती । सेवा साधिती आदरें ॥ बैसोन करवंदजाळींत समर्थ । भाविकां बोधिती तेथें चि हितमित । उपासनेचा धरूनि हेत । केला परमार्थ सुकाळ ॥ शोधित वदन हे गुरुराज । पातला तेथें प्रेमें नृपात्मज । घालोन लोटांगणी जोडूनि करांबुज । स्तवित उभेला जाळीपुढें ॥ गुरुमाउलीसी उपजली कृपा । म्हणतिलें आरत ये श्रमलासि भूपा । संतोष न धरवे तेणें नृपा । वंदोन सन्निधीं बैसला ॥ पूर्वी ते स्थळीं त्यासी वरद । जाला लाभला आत्मैक्यबोध । गुरुदक्षणाखालीं राज्य समुद । लेहोन अर्पिला तेथें चि ॥ लावावया हुमुंजी निशाण । आज्ञा दिधली ते स्थळीं सज्जनें । आतां हि जाळींत ध्यान संधान । सांगूनि केले कृतार्थ ॥ अद्यापि तेथें सांगती जन । हें नृपाचें उपदेशस्थान । परी उपदेशकाळींचें जें महिमान । जाणे जगदंबा पूर्वी च ॥ मग राजास ह्मणती ऐक पां गोष्टी । दर्शना न यावें होत तूं कष्टी । सुचऊं तंव येईं घेऊं भेटी । उपासनाखटपटी आम्हा असे ॥ विनवी नरवर्यु न कंठवे जी । अरे बंधान करीं सांग सकळ राज्यीं । नेमें मन ठेवीं ध्यानामाजीं । होसील योग्यांत योग्य तूं ॥ विकळला तेणे न सुचे कांहीं । उठवोन वदतिले प्रस्तुत जाईं । स्वल्पकाळचि राहसील संग्रहीं । ऐकोनि तोषला सुवाक्यें ॥ माहाराजाचा दंडक प्रभाव । आज्ञाप्रमाणे वर्तती सर्व । नमोनि सहसैन्यीं उदासी राव । पोहचोन राहिला प्रतापगडीं ॥ अमात्य राजाचा निळोपंत । विश्वासिक बहु जाणे हितमित । न गमे राजाला आठवोन गुरूतें । सांगे वृत्तांत तयापुढें ॥ तेणें तयासी अनुताप जाला । प्रार्थूनि घे आज्ञा बळें नृपाला । नेणो भावाचा बनला पुतळा । पातला त्वरेनें गुरुसन्निधीं ॥ जो सिष्य गुरूचा विश्वासी पूर्ण । त्या पुण्यवंताचें होतां दर्शन । अनुतापोन तरती पापी जन । प्रमाण हरिहरवाक्य यासी ॥ तरोन तारी तो सिष्य उत्तम । स्वयें तरूं पाहे जाणा मध्यम । न तरे ना सिके बिगाडी अधम । अधमाधम गुरुद्वेषी ॥ स्वयें गुरुरूप जाला परम । सेवाविषईं जडलें प्रेम । निष्कामबुद्धीनें राखी क्रम । तो उत्तमोत्तम जाणावा ॥ पहा दासाचे सत्सिष्य भले । प्रज्ञावंत गुणी धर्मागळे । लाहोनि गुरुआज्ञा तारित चि चालिले । ऐका प्रस्तुत पंताख्या ॥ पाहोन तयाचें निर्मळ हृदय । केला कृपेनें पूर्ण अनुग्रह । तत्काळ स्वरूपीं जाला तन्मय । उमटे वर्चस्व मुखाब्जीं ॥

वंदोन गुरुआज्ञा स्वस्थळा आला । जों देखे दुरोनि राजा तयाला । पालटोन वृत्ति ठसलीसे कळा । नमस्कार केला उठोनि ॥ पंत वदे हें केलें अधिक । आपुले अन्नाचे आह्मी पोषक । उत्तर दे तया ब्रह्मादिक । गुरुपुत्रा वंदन करिताती॥ सानथोर येथें निवडावे काये । गुरुवर्म कळले ज्या तो थोर होये । रजोगुण-समंध्या हे न कळे सोये । म्हणोनि सन्मान बहु केला ॥ यास्तव स्वामींनीं राजसमंधिया । उपदेश न करिती किमपि तया । बचबच करितील नाम सांगोनियां । भुलऊन राया पोटपोसी ॥ धन्य निस्पृही दास उदास । न देती अधिकारीविन्हा उपदेश । स्पर्शों नेदिती अविहितलेश । सिक्षेनें किंवा वरदानें ॥ यद्यपि तयाला देतां उपदेश । तरि सर्वे चि निक्षून बोलती त्यास । गुप्त राखा हा ठेवा विश्वास । तैसे चि वर्तती विवेकी ॥ ऐकाल ये विषई पुढें वृत्तांत । पातला सदनीं निळोपंत । भार्या निराई वंदोन वरातें । समाचार ऐके समूळ ॥ तेणें विश्वास जडला अंतरीं । उतावीळ भावें प्रतिज्ञा करी । पाहीन स्वामींला जंव दृष्टिभरीं । पारणें करीन प्रसाद ॥ न सेवी च अन्नपान-जीवन । लोटले यापरी बत्तीस दिन । अंतरसाक्षी महाराज सज्जन । सुधापान धैर्य करवितसे ॥ जेवि नेम ठसो तारामतीसी । रक्षी तपानें वसिष्ठ ऋषी । असे बहुतेकी महिमा ऐसी । न डंडळे नीरु गुरुकृपें ॥ सद्गतीची धरिली अपेक्षा । काय पतीनें करावी सिक्षा । विरक्त गुरूची काय कीं इच्छा । भयास्तव धाडितां हि नये ॥ साजण्या वदती हे टाकीं निष्ठा । पाहुणे हिणाविती निग्रहो खोटा । सेवकजन पाया लागती पटपटा । आरंबळ जाला संसारीं ॥ राजादिकीं मानिलें आश्चर्य । वृद्धा म्हणे वो मान मज माय । नवस करीं देवी पुरविताहे । संतति संपत्ति पाहिजे तें ॥ धमकट्या वदती सांडीं हव्यास । अगत्य व्हावा गे जरि उपदेश । या गांवांत आहे कीं महापुरुष । आस्था पुरवील बोलावितां ॥ कवणा हि कांहीं च उत्तर नेदी । नेणों साधली गुरुध्याससमाधि । प्राण वेचतां हि मिसळेन पदीं । ऐसा निश्चयो तियेचा ॥ चार घटिका लोटिली यामिनी । सदनींच प्रगटले मोक्षपाणी । देखोनि साजिरी मूर्ति नयनीं । लोटली चरणीं नुठे चि ॥ सावध कराया जिरऊन प्रेमा । म्हणतिलें करुणा कां न ये अम्मा । क्षुधा लागली अतिशये आम्हा । हें ऐकोनि गडबडें निघाली ॥ विसरली बैसावें जी म्हणायाला । न सुच चि अग्नि आणावयाला । फाडूनि रावणा लाऊनि दिव्याला । चूल पेटविली त्वरेनें ॥ सीघ्र गतीनें व्हावया खीर । इंधन बदला ते जाळी वस्त्र । सिद्ध होतांच जोडूनि कर । प्रार्थी गुरुराया-

कारणें ।। ५३ ।। पंतासी बोलावीं म्हणतिलें त्वरित । बाहतां खुणवोन जाला विस्मित । नमोनि गुरुदेवा विनवी स्तवित । प्राणीस उद्धार करावा ।। आधीं च प्रसन्नु असती भवारि । आज्ञा नोवऱ्यानीं दिधली त्यावरी । नेऊनि कृपेनें देवघर माझारीं । विधानयुक्त उपदेशिलें ।। लोहोनि सद्गुरुकृपावरदान । ससांग भक्तीनें करविलें भोजन । उरला प्रसाद तो करूनि सेवन । पदसंवाहन करित बैसले ।। देखोनि तयांचा भाव उदार । बोगच्यांत दाविलीं जाळिलीं वस्त्रें । सुवासिनीचा पाटाव पदर । अणुमात्र फाटला नसे चि ।। उघड्या अंगानें असती समर्थ । या हेतु दुशाला आणोनि पंतें । पांघरूं पाहतां वदती तयातें । का रे विधिधर्म नेणसी ।। उमदीं तगी ते उतार वस्त्रें । घालूं नये रे अंगावर । अखंडकवच श्रीरघुवीरें । कृपेनें लेविलें असे कीं ।। तेणें चि विहरतों सौख्यसंभ्रमीं । ऐकोनि तुष्टले वदत जी स्वामी । आतां श्रोतेनो गुरुक्रमा तुम्ही । ऐका संकेतीं सांगिजेल ।। ६० ।। हें असो विंबतां हितक्रियवाणी । खुणेसी पावला अमात्य सद्गुणी । मग ऐका हितबुद्धि इच्छितां मनीं । बोलिले ऐका सर्वज्ञ ।। कोणी येविषई भावितील ऐसें । दृष्टांत न पडती नीट संमतीस । अभंगपदादि एसे चि दास । बोलिले काय हो तरि ऐका ।। गंगाजीवन बहुत कुपिका । भरिलें पावन तें होऊं देखा । देतां धरून ये कीं आशंका । तें तीर्थ हें तीर्थ म्हणोनि ।। येक सोन-खोटी येक वजन दुकडे । पाडिलें येकेका येक रोकडे । देतां संदेहीं जाणता न पडे । एवं गुरुवाक्यहित संमती ।। तें हें न मानिजे सद्गुरुसेवा । तेवि वचनाचा अर्थ जाणावा । हें असो तारूनि सिष्य सदेवा । अंतर्धान पावले समर्थ ।। इकडे आसनीं प्रगटले सज्जन । सांप्रदाई तोषले खुणेनें । आश्चर्य मानी तिकडे नृपानें । वर्तमान कळतां निळाजीमुखीं ।। हा वृत्तांतु पसरतां चहुंकडे । येका प्रपंच लुब्धाचे कानीं पडे । सहज तयानीं वानितां पवाडे । घातले घरच्यांनीं त्या बाहिर । ।। ६७ ।। वांकत चि होता कामीं तो सदा । जाचणी विपत्य न मनीं कदा । या भरवसेनें दवाडिलें लुब्धा । येईल झकमारु म्हणोनि ।। या कलियुगीं येकेक ऐसे द्वाड । न मोडिती इलु हि प्रपंच भीड । वैराग्यप्रस्तावीं साधन रोकडें । बोलत्या अपमान करूं पाहती ।। हें असो गृहस्थ तों फडकला तापें । न फिरे चि मागें श्रमत स्मरत रंप । दीनतर पातला सद्गुरुसमीप । नमोनि ठाकला कर जोडुनी ।। करुणाकरांनीं देऊनि धीर । वर्तमान तयाचें ऐकोनि समग्र । कटाक्षें करुणा अंतरीं स्थिर । करूनि बोलिले ऐका कसें ।। ७१ ।। ऐकोन निधान-वाक्य यापरीं । आधींच त्रासला तो हरिखे अंतरीं । पुन्हा जाणता होऊनि

संसारीं । राहूं युक्तीनें बोलती ॥ कां तरी वयान असे कोवळा । प्रपंच हि पडिला असे गळा । विपयासु वाटेल जनाला । आणि टिकाऊ जाला पाहिजे ॥ हें बोलतां इहपर कारणीं पडो । येरू अनुतापीं लागला रडो । म्हणे संसारावरी बीज पडो । लेश सुखाचा नसे जी ॥ देवाधिदेवा अनुग्रह न करितां । कराल उपेक्षा दयाळा आतां । प्राण न ठेवी मी तों सर्वथा । पाडीन देहातें बळें चि ॥ मागें केलें तें मृषा चि अस्क । लोकांचें हि पाहतो कवतुक । पुढें हि सांकडींत पडतां सार्थक । न होय किमपि कळलें जी ॥ पाहोन तयाची दृढता पूर्ण । ठेऊनि तापाजी नामाभिधान । उपदेशूनि विरक्तयुक्त ज्ञान । श्रीरामभजनीं लाविलें ॥ ऐसे अधिकारी ज्ञानी विरक्त । राहिले गुरुसेवनीं पुण्यवंत । उपासना कार्यालागीं समर्थे । मेळविले मेळा सग्रहीं ॥७८॥ उदासीन भिक्षा मिळाली त्यांत । अक्षयी करितसे श्रीरमानाथ । संतर्पण होतसे यथायुक्त । मारुतिदेवासंन्निधीं ॥ शक्तिनुसार भाविकजन । अनुकूळलें तें अर्पिती आणोन । जेथें न स्पर्शे दैन्यत्वपवन । भजन कीर्तन होतसे ॥ बैसोन येकदां शुद्ध येकांतीं । स्तवोन बाहतां आला मारुती । पूजन करोनि यथापद्धती । वनफळभोजन करविलें ॥ वोपूनि मुखशुद्धीं तुळसीदळ । मग करूनि अर्पिले सिद्ध तांबोल ॥ हरि वदे करीं पां भक्ति सुकाळ । उपसना वाढवीं ॥ जी सर्वांतरात्मा प्रमाण आज्ञा । हे चि होती जी माझी वासना । ज्यायोगें गुरुवर्या भूमिजारमणा । करुणा उपजेल तें कीजे ॥ बापा श्रीराम भक्ताभिमानी । न गमे चि तयाला भक्तांवांचुनि । पुरवितील अपेक्षा असेल ते मनीं । तूं तों लाडका आहेसि ॥ करावया जगदोद्धारण । अवतार दिधलासे आम्हाकारणें । हें देऊनि सकृपें पूर्ववरदान । जाला निर्गुण मरुतात्मज ॥ आपणांत आपणु सौख्य पावोनि । गणराज प्रगटले सद्भक्तभजनीं । बोलूनि हितगुज धैर्य त्या वोपुनी । आळवीत श्रीरामा चालिले ॥ लक्ष लाऊनि येकांतस्थानीं । देवाधिदेवा आठवोन ध्यानीं ॥ प्रेमादरें स्तविलें सज्जनीं । येकाग्रचित्तें अवधारा ॥ देवाधिदेवा करुणाघना । भक्ताभिमानी भवभयभंजना । नाकळसी कवणा मनमोहना । करूं विज्ञापना काय आतां ॥ ८८ ॥ ऐकोनि भक्ताचें प्रेमळ वाक्य । देवाधिदेवा वाटलें हरिख । सगुणरूपडें धरूनि चोख । सन्मुखी उभा ठाकला ॥ ७९ ॥ करूनि नमन स्तवन पूजन । करितां मनेच्छा पूर्ण निवेदन । तेणें भक्तासी प्रसन्नवदनें । अभयवर दिधले ऐका कसे ॥ ऐकोनि देवाचें अभयवरदान । जाले समर्थु हरुषायमान । धालेपणाचें करूनि स्तवन । प्रार्थिलें ऐका भावार्थे ॥ देवभक्ताच्या अभेद राहटी । निर्जी निजैक्य पडली मिठी । सुखरूप चि

भासे तेणें सृष्टि । विदित तो जाणत्या अनुभउ ॥ देवभक्ताला भेद चि नाहीं । दाविती तारु लीळानवाई । हें असो परतोन आला निस्पृही । पूर्वस्थळासी डोलत ॥ आनंदला पवननंदन । संतोष वाटला सकळाकारणें । सिंगणवाडीचें धन्य महिमान । जेथें सज्जन विसावले ॥ मंगळभगिनीचा वरप्रसन्नें । काययेक कांहो पडेल नुन्य । होतसे ब्राह्मणसंतर्पण । येक चि स्थितिगत सकळांची ॥ जेथं सुखावले साधुसंत । पुरती सकळांचे मनोरथ । रात्रौकाळीं स्वयें समर्थ । कीर्तनरंगणीं ठाकले ॥ उतटला जेथें दाटूनि प्रेम । टाळी भजनाचा माजला संभ्रम । वाटे अनुभविया संतोप परम । डोले श्रीराम भीमसखा । गाइले बहुतरा पदादि श्लोक । त्यांतील ऐका हो अभंग येक । पुढील भविष्य होतसे ठाउक । अंतर्भाव समजतां ॥ ९८ ॥ ऐसियापरी जालें कीर्तन । स्नानादि सकाळीं सारूनि पूर्ण । करूनि मारुतीरायाचें पूजन । केलें भोजन ससांग ॥ तेथूनि निघाले समुदावसहित । मार्गीं सकळांला हितबुद्धि कथित । चाफळखोऱ्यासी पातले समर्थ । स्थळ विदित असे तत्पूर्वी ॥१००॥ जेथें झाडीची असे बहु दाटी । उतरले तेथें मांडनदी तटीं । आधींच तेथें भीम जगजेठी । सांभाळावया पातलासे ॥ वस्तीस राहिले भ्यासुरस्थानीं । भय संचरले कितेकामनीं । नेणती स्वामींची अद्भुत करणी । हरि चापपाणी ज्या वश्य ॥ मानूनि सत्य भूतप्रेतबाधा । मूढदेहबुद्धि दचके सदा । संकल्प आपुला हें मतिमंदा । नेणवे कष्टी होताती ॥ आपुल्या विकारदृष्टिदोषें । दचकती कांहीं देखोनि भास । धांवती करिती बहु सायास । आत्माध्यासिया भय कायसें ॥ जेथे नांदती श्रीगुरुराव । भोंवते तिष्ठति सकळ हि देव । परि संशई पडले देखोनि ठाव । तो भाव कळला महाराजा ॥ आधीं च उठोनि प्रातसमई । रामकळीस्वरीं गातां निस्पृही । तेणें संचरलें सकळिका हृदई । धैर्य विश्वाससह अनुभव ॥ हें गाऊनि विलोकितां गगनाकडे । उजेड पसरला तेणें चहुंकडे । वाटे सर्वत्रा येथें जरी घडे । वस्ति तरी लाभ दिसतो ॥ जगज्जोती जे अनादिशक्ति । आधीं च पातली कराया वस्ति । नटणा करूं पाहती भक्तिमुक्ति । आग्रह सकळांचा सफळ हो ॥ पुढील प्रसंगीं रसाळ कथन । सगुणोपासना दावितील पूर्ण । अवधान देऊनि करा हो श्रवण । श्रीरघुनंदन भाळेल ॥ दासविश्रामधाम सुंदर । मनोरम्य महा सिंगळापुर । आत्माराम दाहावा जो अवतार । दासस्वरूपें धरिलासे ॥ इति श्रीराम कृपा । तारक परमार्थ सोपा । मित्रभावें देवास सुखदुःख सांगणें । जाळींत राजास वर दिल्हे ।

नीळोपंत आमात्य शिष्य जाला। पत्नी निराई। दृढ संसारलुब्ध तापाजी तरला। सिंगणवाडीत देवासवें बोलणें। चाफळखोऱ्यास येणें। स्तबक सत्तावन ॥ ५७ ॥

## परमानंद कवीकृत शिवभारतांतील शिवाजी महाराजांच्या स्वराज्यस्थापने विषयींच्या ध्येयाच्या स्वरूपा विषयींचे उल्लेख

श्री शिवछत्रपतींचें, स्वराज्य स्थापन करण्यांत कोणत्या प्रकारचें ध्येय होतें, या विषयींच्या अलीकडे उपलब्ध झालेल्या पुराव्याचें दिग्दर्शन या प्रबंधाच्या सुरवातीस केलें आहे. प्रस्तुत ग्रंथाचें लेखन सुरू असतां शिवभारत हा ग्रंथ प्रसिद्ध झाला. शिवभारत ग्रंथाचा कर्ता परमानंद कवी हा शिवाजी महाराजांचा समकालीन होता. त्यानें स्वतः महाराजांचें जें चरित्र डोळ्यांनीं पाहिलें व कानांनीं ऐकिलें तें त्यानें आपल्या ग्रंथांत कथन केलें आहे. ही गोष्ट लक्षांत घेतली असतां, शिवाजी महाराजांच्या राजकारणाचा अथवा स्वराज्य-स्थापनेचा तत्कालीन अस्सल पुरावा या नात्यानें शिवाजी महाराजांच्या ध्येया विषयीचे या ग्रंथांतील उल्लेख बिनमोल समजले पाहिजेत. या ग्रंथांत शिव-जन्मा पूर्वी ब्रह्मदेवाचा व पृथ्वीचा काल्पनिक संवाद कवीनें वर्णन केला आहे. पृथ्वीच्या मुखांतून कवीनें खालील कल्पना वदविली आहे:—

**ये हताः प्रथमं देवैर्दुर्मदास्त्रिदशद्विषः**
**ते मां तुदन्ति तिष्येऽस्मिन् उपेत्य म्लेचरूपताम्॥ अ. ५ श्लो० ३७**

अर्थ—ज्या दुष्ट दैत्यांचा देवांनीं पूर्वी संहार केला, ते च कलियुगा मध्यें म्लेंछरूप धारण करून मला पीडा देत आहेत.

परमानंद कवीच्या उक्तींत आणि “ पूर्वी जे मारिले होते। ते चि आतां बळावले। ” या समर्थ रामदास स्वामींच्या उक्तींत दृष्टोत्पत्तीस येणारे साम्य लक्षांत ठेवण्या सारखें आहे. एका च प्रकारच्या कल्पनांनीं त्या काळच्या लोकांचीं मनें भारून गेली असल्या कारणानें एकाच तऱ्हेचे उद्गार निर-निराळ्या व्यक्तींच्या तोंडून निघालेले आपल्या दृष्टोत्पत्तीस येतात. म्लेंछाच्या राजकीय वर्चस्वा मुळें महाराष्ट्रीयांच्या आचारांत आणि विचारांत कोणत्या प्रकारची क्रांति झाली होती, याचें कवीनें खालील श्लोकांत उत्तम प्रकारचें दिग्दर्शन केलें आहे.

**नाहूयन्ते दिविषदो न हूयन्ते हुताशनः । न वेदा अध्यधीयन्ते नाभ्यच्र्यन्ते द्विजातयः ॥४०॥ न सत्राणि प्रवर्तन्ते तथैवच मखक्रियाः। न दानानि विधीयन्ते विहियन्ते व्रतानि च॥४१॥ खिद्यन्ते साधनसर्वे भिद्यन्ते धर्मसेतवः । म्लेंछधर्माः प्रवर्तन्ते हन्यन्ते धेनवोऽपि च ॥४२ सज्जना यान्ति विलयं व्रजन्ति क्षत्रियाः क्षयम् । प्रादुर्भूतमिदानीं मे यवनेभ्यो महद्भयम् ॥ ४३ ॥** अध्याय ५.

अर्थ—देवांचे कोणी आवाहन करीत नाहीं; अग्नींत कोणी हवन करीत नाहीं; वेदांचें हि अध्ययन सुटलें आहे; सत्रें आणि यज्ञक्रिया यांना फांटा मिळाला आहे; दानें आणि व्रतें संपुष्टांत आलीं आहेत; सज्जनांस दुःख होत आहे; म्लेंछधर्म वृद्धि पावत आहे; गाईची हि हत्या घडत आहे; साधूंचा नाश होत आहे; क्षत्रिय लयास चालले आहेत; अशा प्रकारें हल्लीं मला यवना पासून मोठें भय उत्पन्न झालें आहे.

या श्लोकांत परमानंद कवीनें वर्णन केल्या प्रमाणें महाराष्ट्रीय समाजाची स्थिति झाली होती. महाराष्ट्रीय हरिकथानिरूपणी पुढाऱ्यांनीं त्या काळच्या समाजाच्या स्थितीच्या केलेल्या वर्णनाशीं हें वर्णन पूर्णपणें जुळत आहे. या नंतर " जिजाबाई मला आपल्या तेजस्वी उदरांत धारण करील; आणि तिचा पुत्र होऊन मी तुझें प्रिय करीन. " असें विष्णूनें पृथ्वीस सांगितल्याचें कवीनें नमूद केलें असून विष्णूनें शिवाजीचें रूप धारण करून पृथ्वीवर अवतार घेतल्या वर कोणकोणतीं कृत्यें करण्याचें आश्वासन दिलें याचें परमानंद कवीनें खालील श्लोकांत वर्णन केलें आहे.

**स्थापयिष्यामि धर्मस्य मर्यादां भुवि शाश्वतीम् ।**
**यवनान् सादयिष्यामि पालयिष्यामि देवताः ॥ ५५ ॥**

अर्थः—" मी पृथ्वी वर धर्माची शाश्वत मर्यादा स्थापीन; यवनांचा उच्छेद करीन; देवांचें रक्षण करीन; यज्ञादि क्रिया पुन्हा सुरू करीन; गाई व ब्राह्मण यांचें पालन करीन असें मला वचन देऊन हे कल्याणी, भूतभविष्य जाणणाऱ्या भगवानानें मला सत्य लोकास जाण्यास अनुज्ञा दिली. "

छत्रपति शिवाजी महाराजांच्या ध्येया विषयीं आजपावेतों उपलब्ध झालेल्या पुराव्यांत शिवभारतांतील वरील श्लोकांच्या योगानें अत्यंत महत्त्वाची भर पडली आहे व शिवछत्रपतिकालीन मराठ्यांच्या स्वराज्यस्थापनेचें ध्येय ' महाराष्ट्रधर्मस्थापना ' हें च होतें हा सिद्धांत या पुराव्याच्या योगानें दृढावला आहे.